# भिल्लिणीचीं बोरें

लेखिका

शकुंतला परांजपे

किंमत ३ रुपये

## अर्पणपत्रिका



" तात्या गोष्ट सांगा. " आमच्या दारांत पाऊल ठेवतांक्षणींच तुमचीं जोडा काठी लपवून मीं तुमच्याकडून गोष्टीची वसुली करीत असें. हा माझा ससेमिरा चुकविण्याकरितां तुम्हीं " भासकवीच्या नाटककथा " गोष्टीरूपानें लिहून तें पुस्तक मला अर्पण केलेंत. त्या वेळीं मीं आठ नऊ वर्षांची असेन. **हरी नारायण आपटे** यांनीं पुस्तक अर्पण करावें हा आपला केवढा गौरव आहे हें त्या वेळीं मला कळलें नाही. आज—तुम्ही गेल्यावर अनेक वर्षांनी—तें कळतें; आणि तें व्यक्त करण्याकरितां, आधीच उष्टावलेलीं हीं " भिल्लिणीचीं बोरें " पूर्वीच्याच प्रेमानें व आज वाटत असलेल्या आदरानें मीं तुम्हांस अर्पण करितें.

—शकू

## कोंकणची शाबासकी

श्रीगजानन आंजर्लें, ता. ४-२-४४

श्रीमती शकुंतलाबाई परांजपे मु. पुणें यांसी भालचंद्र गजानन निजसुरे मु. आंजर्लें याचे कृतानेक सा. नमस्कार विनंती विशेष. माझी व आपली प्रत्यक्ष ओळख नाहीं तथापि मी आंजर्लें येथील रहिवाशी असल्यामुळें आपणांस ओळखितों. माझी दृष्टि बिघडल्यामुळें मला अकाली पेन्शन घ्यावें लागलें. मी रोज नियमितपणें रा. गोविंदशास्त्री पेंडसे यांजकडे वाचनासाठीं जात असतों. ते मला मोठ्या हौसेनें वाचून दाखविण्याची कामगिरी करितात. आपण सह्याद्रींत घोडागाडी या मथळ्याखालीं लिहिलेले तीनही लेख आम्हीं वाचले. आम्हां उभयतांस ते फारच पसंत पडले. आपली लेखन-पद्धति साधी व सरळ असून तीत स्वभावोक्ति हा गुण ठळकपणें दिसून येतो. आमचे मतें हे लेख उत्तम विनोदी लेख म्हणून गणले जातील. मात्र अज्ञानी वाचक म्हणजे बऱ्याच खालच्या प्रतीचे वाचकांची आपणां-

संबंधीं गैरसमज होण्याची भीति वाटते. त्यांस वाटेल कीं ही बाई दांडगी उद्धट व बेफिकीर असून हिच्या ठिकाणीं आपल्या बापासंबंधीं बिलकूल प्रेम अगर पूज्यबुद्धि नाहीं. पण वस्तुस्थिति सर्वस्वीं उलट असून हा एक विनोदी लेखांचा मासला आहे असें सूज्ञ वाचक तेव्हांच समजतील हें निःसंशय होय.

या लेखांतून आपले वडील सर आप्पासाहेब यांच्या अत्यंत साध्या राहणीचें व उदात्त स्वभावाचें एखाद्या झिरझिरीत वस्त्रांतून आंत ठेवलेली वस्तु दिसावी तसें अस्पष्ट व गंभीर असें स्वभावदर्शन होतें. हा लाभ वाचकांस बराच महत्त्वाचा व अलभ्य असा वाटेल अशी खात्री वाटते. आपण म्हैसूर संस्थानांत गेलां होतां तरी तिकडील प्रवासवर्णन प्रसिद्ध केल्यास तेंही बोधप्रद होईल अशी खात्री वाटते.

कळावें लोभ असावा हे विनंती.

भा. ग. निजसुरे यांजकडून

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

**वि. स. खांडेकर**

१ फुलें आणि दगड १।।।
२ घरट्याबाहेर १।।।
३ पहिलें प्रेम (आ. २ री.) ३
४ जळलेला मोहर ३
५ क्रौंचवध ४
६ सायंकाल (आ. २ री.) २।।
७ अविनाश १।।।
८ मंदाकिनी १।।।
९ सहा भाषणें २
१० कलिका २।
११ स्त्री आणि पुरुष २
१२ पांढरे ढग ४।

**ग. त्र्यं. माडखोलकर**

१ अवशेष २
२ नागकन्या २
३ माझी नभोवाणी २
४ नवे संसार (जप्त) ४
५ चंदनवाडी ६।।
६ व्यक्तिरेखा २।

**ना. धों. ताम्हनकर**

१ तात्या भा. १ ला. २।।
२ तात्या भा. २ रा. ३
३ निवाडे भा. १ ला. २।।
४ चकमकी १।।
५ बच्चा नवरा १।।
६ अनेक आशीर्वाद ३।।

**चिं. वि. जोशी**

१ आणखी चिमणराव (आ.२) ४
२ नवें भारूड २
३ स्टेशनमास्तर २

**साने गुरुजी**

१ पुनर्जन्म २।।
२ आस्तिक २।।

**दत्तु बांदेकर**

१ सख्याहरी १।।।
२ नवी आघाडी १।।

**द. र. कवठेकर**

१ अपुरा डाव ३
२ रेशमाच्या गांठी ३
३ आभाळाची सांवली ४

**वा. म. जोशी**

१ स्मृति-लहरी २
२ विचार-लहरी २।
१ नवें जग ?–पु. य. देशपांडे २।।
१ रॅायचरित्र–भाई बेके १।।

**प. ले. वि. स. खांडेकर**

१ काव्यज्योति १
१ पारंब्या-आनंदीबाई जयवंत १।।

**लक्ष्मण० सरदेसाई**

१ ढासळलेले बुरूज २

**प्रो. वि. ह. कुलकर्णी**

१ व्यक्तिचित्रें २।।
१ फसगत–ना. ह. आपटे १।।
१ साखरपुडा–प्र. के. अत्रे १।।

**कृष्णाबाई मोटे**

१ मीनाक्षीचें जीवन २।
१ चलतीं नाणीं र. गो. सरदेसाई २

**रा. श्री. जोग**

१ सौंदर्यशोध आणि आनंदबोध ८
१ हितपत्रें–ना. म. पटवर्धन ३
१ बेबीची बहीण वि. वि. बोकील ३
१ ग्रह आणि तारे-सत्यग्राही ४।।

**अनंत काणेकर**

१ धुक्यांतून लाल ताऱ्याकडे ३

**काकासाहेब कालेलकर**

१ ब्रह्मदेशाचा प्रवास १।।

**य. दि. पेण्ढरकर**

१ प्रापंचिक पत्रें ३
१ स्टॅलिन–वि. म. भुस्कुटे १।।

**कमलाबाई टिळक**

१ आकाशगंगा २।।

**शकुंतलाबाई परांजपे**

१ भिल्लिणीचीं बोरें ३

# आगामी प्रकाशनें

**वि. स. खांडेकर**

१ अश्रु
२ बुद्ध आणि हिटलर
३ चल ये राणी
४ विसावें शतक
५ तिसरी भूक
६ वर्षाकाल
७ छाया भाग १-२
८ वालुका
९ कालचीं स्वप्नें
१० चार भिंती
११ मंजिऱ्या
१२ मराठीचा नाट्यसंसार
१३ वा. म. जोशी ( व्यक्ति आणि वाङ्मय )
१४ फुलें आणि कांटे
१५ पहिली लाट
१६ कल्पलता

**ग. त्र्यं. माडखोलकर**

१ तीन दिवस
२ ऋणभार
३ माझे आवडते कवि
४ चक्रवर्ती उदयन
५ उर्वशी

**द. र. कवठेकर**

१ आपुलकीची झळ
२ ढगाआड
३ आग आणि पाणी

**ना. ह. आपटे**

१ साजणी

**शकुंतला परांजपे**

१ चांदणी

**ना. धों. ताम्हनकर**

१ निवाडे भा. २ रा
२ गुजाताई
४ शेजारी

**य. दि. पेण्ढारकर**

१ घायाळ

**प्र. के. अत्रे**

१ ललित वाङ्मय
२ 'मी' कसा झालो

**कृष्णाबाई मोटे**

१ अनामिकेची पूजा
२ कलाक्षेत्रांत
३ मवाली

**काकासाहेब कालेलकर**

१ स्मरण यात्रा

**अनंत काणेकर**

१ उघड्या खिडक्या
२ काळे आणि पांढरे
३ पिकली पानें ( दुसरी आवृत्ति )

**चिं. वि. जोशी**

१ गुंड्याभाऊ
२ दरबार कथा

**दत्तु बांदेकर**

१ हिरवी माडी
२ तूं आणि मी
३ कबुली जबाब

**कुसुमावतीबाई देशपांडे**

१ मोळी

**साने गुरुजी**

१ सोन्यामारुति

**रामतनय**

१ साखरगोटी

## मी पुरुष झालें असतें तर ?

१

**म**नुष्य दुःखांत असला कीं त्याला झोंपेंत आणि जागेपणीं सुखाचीं स्वप्नें पडत असतात व तो सुखांत असला म्हणजे त्याला कधीं कधीं दुःखाचे डोहाळे आठवतात व तो आपल्याशींच केव्हां केव्हां, उद्यां मी दरिद्री झालों तर ?—माझी बायको दुसऱ्याच कोणाचा हात धरून पळून गेली तर ?—माझीं मुलें पटकीनें मेलीं तर ?—मीं एखाद्या अपघातांत सांपडून जन्माचा लंगडालुला झालों तर ?—अशा प्रकारचे नानाविध कुतर्क करीत बसतो. अशाच कुतर्कांच्या फेऱ्यांत सांपडल्यावर कधीं कधी माझ्यापुढें हा प्रश्न उभा राहतो—मीं पुरुष झालें असतें तर ? कितीतरी आपत्ति माझ्यावर कोसळल्या असत्या ! मला रोज दाढी करावी लागली असती, पुरुषांचा रूक्ष पोषाख करावा लागला असता, तलम रेशमी साड्यांना मला जन्माचा राम-राम ठोकावा लागला असता, रंगीबेरंगी बांगड्या दुरूनच पाहून मला माझी

तहान भागवावी लागली असती; पावडर, काजळ, रंग यांना मला कायमचें मुकावें लागले असतें, डूल किंवा कुडीं न वापरल्यामुळें बारशाच्या दिवशीं टोंचलेली माझ्या कानाचीं भोकें बुजून गेलीं असतीं...नाहीं नाही, एखाद्या नाटकमंडळींत स्त्रीची भूमिका करून आठवड्यांतले कांहीं तास तरी मीं वरील नाजुक लेण्यांचा उपभोग घेतला असता. पण दिवसेंदिवस स्त्रिया स्वतःच स्त्रियांचीं कामें करण्यास पुढें सरसावत असल्यामुळें तेवढें सुख तरी मला लाभलें असतें कीं नाहीं कोण जाणे ? पण कांहीं झालें, कितीही स्त्रियांच्या भूमिका मीं केल्या असल्या तरी, मी पुरुष झालें असतें तर मनोरमाबाई थत्ते यांनीं प्रतिपादन केलेल्या अठरा महिन्यांच्या अव्याहत संभोगसुखाला म्हणजे नऊ महिने मूल पोटांत असतांनाच्या, यमयातना होऊन बाळंत होतांनाच्या, व नऊ महिने मूल अंगावर पाजतांनाच्या अशा एकूण आठरा महिन्यांच्या संभोगसुखाला मी खासच अंतरलें असतें. नको नको, परमेश्वरा प्राणिमात्राच्या कोठच्याही कोटींत मला जन्माला घाल, पण नरजातींत कधींही घालूं नको !

शिवाय मी पुरुष झालें असतें तर मला कांहींतरी उद्योगधंदा करावा लागला असता. हो, कारण तें पुरुषांचें काम आहे. पुरुषांनीं पैसा हा कमावलाच पाहिजे. बायकांनीं सुद्धां हवा असल्यास कमवावा. पण तो केव्हां ? जेव्हां त्यांना बाप, नवरा, दीर, चुलता, भाऊ, मित्र, वगैरे कोणाकडूनही पैसे उकळतां येणार नाहींत तेव्हां. मुलाबाळांचें संगोपन आणि घरांतली देखरेख एवढींच कामें निसर्गानें बायकांच्या वांट्याला दिलीं आहेत तीं त्यांनीं करावींत अथवा नाहीं; पण पुरुषांनीं मात्र दररोज घराबाहेर आठ दहा तास राबून रक्ताचें पाणी करून पैसे मिळवून घरीं आणले पाहिजेत. आणि एखादा पुरुष असें जर न करील तर त्याच्यावर घरांतून पुष्पांजली तर होईलच, पण समाजांतील इतर पुरुषही त्यालाच नांवें ठेवतील. इतकें

करूनही बायकांची ओरड आहेच कीं, पुरुषांनीं आम्हांला गुलाम करून ठेवलें आहे. काय लुच्चेगिरी पाहा ! या बायका आमच्याकडून कशीं आपलीं कामें करवून घेतात. सभेमध्यें बायका आल्या कीं त्यांना आम्हीं उठून चांगल्या जागा दिल्या पाहिजेत, टेनिस खेळतांना आम्हीं त्यांचे चेंडू गोळा केले पाहिजेत, बाजारांतून कांहीं आणायचें झालें कीं आम्ही सायकलवर स्वार झालें पाहिजे, यांना कुठें परगांवीं किंवा रात्रीं जलशाला जायचें असलें कीं आमचीं कामें सोडून आम्हीं यांच्याबरोबर सोबत गेलें पाहिजे. शाळा–कॉलेजांतून पुढील बांकें आम्हीं यांच्यासाठीं खालीं केलीं पाहिजेत आणि इतकें करूनही वार्षिक संमेलनाच्या वेळीं बायकांच्या तर्फे एक प्रतिनिधि राखून ठेवूनही फिरून सार्वजनिक निवडणुकींत यांना उभें राहयाला पाहिजे. नाहीं तर यांनीं संमेलनावर बहिष्कार टाकलाच. आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे या बायका आम्हांला भुरळ पाडून आमच्याच तोंडून आमची निंदा करवतात आणि आम्हाला आमच्याच सत्तेवर आणि अधिकारावर पाणी सोडायला लावतात. मतांचे हक्क यांना आम्हीं मिळवून द्यावे, बाप किंवा नवरा मेल्यानंतर वारसा मिळवून देण्याची यातायात आम्हीं करावी, विधवांशीं लग्नें आम्हीं करावीं, घटस्फोटाचा कायदा करण्याची खटपट आम्हीं करावी आणि या बायकांची बोंब आहेच कीं पुरुषांनीं आम्हांला बंदिवासांत ठेवलें आहे, आमची मुस्कटदाबी केली आहे, आमचा छळ चालवला आहे. अहो, अण्णासाहेब कर्वे, गोपाळराव देशमुख, आहांत कोठें ? शुद्धीवर या आणि या बायकांचें स्तोम माजवायचें बंद करा. नाहीं तर एक दिवस या आपल्या उरावर बसतील, डोक्यावर मिरीं वाटतील; अहो, आपल्याला कैदेंतसुद्धां टाकतील......अरे, पण हें काय ? कल्पनेच्या भरारींत मी खरोखरीच पुरुषासारखी बोलूं लागलें कीं ! माफ करा भागिनींनों ! चुकलें, क्षमा करा आणि तुम्ही या पुरुषांना पूर्णपणें आपल्या कह्यांत ठेवा.

गोड गोड बोलून, रुसून, फुगून, वेळ पडल्यास रडून देखील यांच्याकडून आपलीं सर्व कामें करवून घ्या, त्यांना एक मिनिटभरसुद्धां मोकळे सोडूं नका. कारण जराशी फुरसत मिळाली कीं हे राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय, देशी-विदेशी, मालक-मजूर वगैरे नसती कुभांडें रचून रणें माजवतील, लढाया करतील, फार काय, तुमचे-आमचे पोटचे गोळे सुद्धां त्यांत बळी द्यायला कमी करणार नाहींत.

असो. पण हें विषयांतर झालें. आतां मी पुरुष झालें असतें तर मला कांहींतरी उद्योगधंदा करावा लागला असता ही गोष्ट निर्विवाद आहे. तेव्हां मीं काय केलें असतें ? माझी काय लायकी आहे ? माझें शिक्षण किती झालें आहे ? मुंबईच्या *B. Sc.* च्या परीक्षेंत पहिला वर्ग आणि केंब्रिजच्या *B. A.* च्या परीक्षेंत पहिला नाहीं दुसराही राहिला, फक्त तिसराच वर्ग मला मिळाला आहे. अर्थात् सध्यां मी स्त्री आहें या जोरावर मला विदुषी म्हणून आढ्यतेनें लोकांकडे पाहतां येतें, आणि वरील दोन्ही परीक्षांचें शिक्के मिळविणारी पहिलीच स्त्री म्हणून टेंभाही मिरवतां येतो; पण हीच जर मी पुरुष झालें असतें, तर माझ्या या विद्वत्तेला किती जणांनीं विचारलें असतें ? नोकरीकरतां किती लोकांकडे मला खेटे घालावे लागले असते ? किती उंबरठे मला झिजवावे लागले असते ? हो ! वडिलांच्या नांवावर निदान फर्ग्युसन कॉलेजमध्यें तरी मला नोकरी मिळाली असती आणि मग टिळक, आगरकर, गोखले, परांजपे या मालिकेंत मलाही बसायला मिळालें असतें. कारण या विभूतीनीं स्वार्थत्याग करून ज्या संस्थेंत काम केलें त्याच संस्थेंत दाखल झाल्याबरोबर मीही त्यांच्याच योग्यतेला चढलें असतें. आणि हें मी जगभर सांगत फिरलें असतें, माझ्या स्वार्थत्यागाची ग्वाही फिरवली असती. माझ्या कर्तबगारीची जाहिरात दिली असती.

पण नाहीं. मी पुरुष झालें असतें तर याहीपेक्षां सत्कार्य करणाऱ्या एका

संस्थेची मी चार आणे देऊन सभासद झालें असतें. मवाळ बापाच्या पोटीं येऊनही सत्याचा व अहिंसेचा दिव्य प्रकाश मला खात्रीनें दिसला असता. आचार्य अत्र्यांना नाहीं का तो दिसला? आगरकरांच्या पुण्य-स्मरणार्थ शाळा काढून, सावरकरांच्या भोंवतीं कांहीं दिवस गोंडा घोळून अखेरीस मोक्षाला पोहोंचण्याचा दिव्य मार्ग त्यांना नाहीं का सांपडला? त्याच मार्गानें मीही चालूं लागलें असतें. शत्रुपक्षांतून पश्चात्ताप पावून आलेला सभासद म्हणून माझें त्रिवार कौतुक झाले असतें. या थोर संस्थेला मीं आपलें सर्वस्व वाहिलें असतें. कोणत्याही प्रांताची दिवाणगिरी पत्करली असती. माझ्या मुलीला उच्च शिक्षण देण्याकरितां विलायतेस पाठविलें असतें. तिसऱ्या वर्गांतून प्रवास केला असता. परगांवीं गेल्यावर अन्यपक्षीय लोकांचा पाहुणचार मीं घेतला नसता. फार काय, सत्य व अहिंसेचीं तत्त्वें न पटणाऱ्या प्रत्यक्ष माझ्या पित्याच्या घरींही मी कधीं उतरलें नसतें. स्वपक्षीयांच्या दोषांकडे मीं दुर्लक्ष केलें असतें. कोणत्याही गुन्ह्याखातर ते तुरुंगांत गेलेले असोत, त्यांना मीं बंधमुक्त केलें असतें. परमात्म्याचें किंवा त्याच्या योग्यतेला पोहोंचलेल्या कोणत्याही विभूतीचें स्मरण केल्यावर सर्व पापांचें क्षालन होतेंच मुळीं. आणि त्यांच्या दर्शनानें व आशीर्वादानें तर त्यांनीं स्वतःच कान पिळलेल्या इसमांच्या अंगीं मंत्रिपदाचीं सूत्रें चालव-ण्याची पात्रता येते. असे सरदार पुण्यात्मे प्रसवण्याचें सामर्थ्य ज्या गुर्जर भूमींत आहे, त्या गुर्जर भूमीचे सर्व सोहाळे मीं पुरवले असते. परदेशांत स्वपक्षांतील गुह्य गोष्टींचा स्फोट मीं कधींही केला नसता, देशाचें खरें हित इच्छिणाऱ्या वर्तमानपत्रांनाच मीं सरकारी जाहिराती दिल्या असत्या आणि सरकारी छपाईचें काम देशाची खरी कळकळ बाळगणाऱ्या छापखान्यालाच मीं दिलें असतें. सरकारी कारभार मीं चोख ठेवला असता, सरकारी कागद-पत्र मीं नीट जपून सुरक्षित ठेविले असते. पैशाची अफरातफर मीं

कधींही केली नसती. गोरगरिबांना मीं दारूच्या दुष्ट व्यसनांतून सोडविलें असतें आणि त्यामुळें अबकारी खात्याच्या बुडत्या उत्पन्नाची भर करण्याकरतां मीं अनेक योजना शोधून काढल्या असत्या, दीड–दीड वर्षांच्या मुलांकडूनही मीं राष्ट्रोपयुक्त कामें करवून घेतलीं असती; पहा बरे, हल्लीं लहान मुलांच्या सर्व शक्तीचा व वेळेचा किती अपव्यय होतो तो. काठीचा घोडा करून धावण्यांत, बाहुला-बाहुली, कुत्रीं-मांजरे, चेंडू-दांडू यांच्याशीं खेळण्यांत, वाळूचे बोगदे करण्यांत आणि पत्त्यांचीं घरे बांधण्यांत त्यांची शक्ति कशी अनाठायीं खर्च होते ती; प्रौढ माणसाच्या दसपट हाल-चाल करण्याची कुवत एका छोटयाशा मुलांत असते आणि ती आपण सर्व फुकट जाऊं देतों ! धिक्कार असो आमच्या अकलेला आणि आमच्या शिक्षणपद्धतीला ! वस्तुस्थिति सुधारण्याविषयीं विचार करण्याकरितां मीं अनेक समित्या नेमल्या असत्या. अहाहा ! एकदां या सत्पंथाला लागल्यावर मीं काय केलें नसतें ? पण समजा, दिवाणगिरीच्या धुंदींत मीं शिस्त मोडली असती तर ? आणि माझ्या हितकर्त्यांनीं माझें हित कशांत आहे हें सांगूनही मला तें समजलें नसतें तर ? अर्थात् मला योग्य तें शासन मिळालें असतें, माझा जाहीर धिक्कार करण्यांत आला असता. मी पदच्युत झालों असतों.

मग मीं काय केलें असतें ? तेल गेलें तूप गेलें हातीं धुपाटणें आलें अशा स्थितींत मला कांहीं तृतीय पंथ दिसला असता का ? होय; खचित दिसला असता. ज्या पंथांत अनेक जाती-पोटजाती नाहींत, ज्या पंथांतील अनुयायांची दृष्टि राष्ट्राच्या आकुंचित आणि मर्यादित क्षेत्रांत कुचंबत राहत नाहीं, जो पंथ अखिल दुनियेंतील आपल्या अनुयायांमध्यें भेदभाव न मानतां त्यांना एकाच छत्राखालीं घेतो, अशा थोर पंथांत शिरून मीं माझें उरलेलें आयुष्य खर्चिलें असतें. खरोखर मी पुरुष झालें असतें तर हिंदु धर्माच्या, हिंदु समाजाच्या हिंदु राजकारणाच्या अगम्य चक्रव्यूहाला मीं कायमचा रामराम ठोकला

असना, आणि शरणागताला प्रेमानं जवळ घेणाऱ्या इस्लामी धर्माची मी अनुयायी झालें असतें. ऐषआरामांत लोळलें असतें. रात्रंदिवस हुक्क्याचे झुरके मारले असते. खूपसुरत बेगमा केल्या असत्या. परधर्मांतील मुलींना भुरळ पाडून त्यांच्याशीं निका लावला असता. आणि एकजात सर्वांना पडद्यांत ठेवल्या असत्या. आमच्या पंथाचें वर्चस्व सर्वांना पटवून दिलें असतें. सलोखा करण्याच्या अभिषानें मोठ्यामोठ्या पंडितांना महात्म्यांना माझ्यापुढें मान तुकवायला लावली असती. हांजी-हांजी करायला लावली असती. समेटाच्या पांच-पंचवीस अटी घालून सर्वांना आपलीं डोकीं खाजवायला लावलीं असतीं. हरतऱ्हेनें उर्दू भाषेचा पुरस्कार केला असता. त्यांतील हिंदी शब्दांना हुसकावून लावलें असतें. सर्वत्र उर्दू लिपीचाच प्रघात पाडायचा मीं आटोकाट प्रयत्न केला असता. जेव्हां जेव्हां मला सहाजिकपणें सत्ता मिळाली नसती, तेव्हां तेव्हां अल्पसंख्याकांचें संरक्षण या सबबीवर मीं ती मिळवली असती. मोठ्या हुद्द्याची व गलेलठ्ठ पगाराची एखादी नोकरी मीं पटकावली असती. अर्थात् तें काम करण्याची बुद्धि माझ्या अंगीं नाहीं असें जर मला आढळून आलें असतें, तर तेवढें काम मात्र मीं माझ्या हाताखालील एखाद्या हुशार हिंदु कारकुनाकडून करवून घेतलें असतें. मोठ्या पगाराच्या नोकऱ्या, पैसेवालीं कामें मीं स्वधर्मीयांकरितां राखून ठेवलीं असतीं. कलकलाट करून देवाला पाचारण करणाऱ्या काफीरांना मीं भंडावून सोडलें असतें. त्यांचीं डोकीं फोडलीं असतीं. कोणीहि कसलीही इमारत बांधायला निघाला असता कीं मीं ती जमीन उलथीपालथी करून स्वधर्मीयांचीं पवित्र हाडें तींत शोधून काढून त्या बांधकामाला मोडता घातला असता. अशा रीतीनें माझी कुलपरंपरा विसरून जाऊन मीं इस्लामी धर्माची पुढारी बनलें असतें. अल्ला हो अकबर !

ऑगस्ट १९३८

## शेळीची शिकार ! २

दुपारचा एक वाजला होता. मी रेडिओ लावून पुस्तक कुशींत घेऊन पहुडलें होतें. झोंपहि लागली असावी. स्वप्नांतच 'शकू अग शकू' म्हणून कोणीतरी मोठ्यानें हांक मारीत असल्याचा भास झाला. जागी होऊन पाहातें तों आजी घाबऱ्या घाबऱ्या सांगूं लागली. 'अग ती बघ एक शेळी बागेंत शिरून सर्व भाज्या खाऊन टाकते आहे'. मी ताडकन् उठलें तों खिडकीच डोक्याला लागून जीव कळवळला; पण त्याकडे यत्किंचित्‌हि लक्ष न देतां मी मागीलदारीं जाऊं लागलें. जातां जातां शेळीला पकडायला म्हणून नुकतेंच धुवून वाळत घातलेलें आप्पांचें धोतर दांडीवरून ओढलें. हो, दोरी शोधीत बसलें तर शेळाबाई मुंबाल्या करायच्या. याला म्हणावं समयसूचकता ! पटकन् अंगणांत येऊन आधी फाटक लावलें व मग शेळीच्या पाठीमागें धावूं लागलें. तीहि धावूं लागली; पण फाटक लावलें असल्यामुळें तिला निसटून जातां येईना.

आतां आमची शिवाशिवी चालू झाली. पावसाळ्याचे दिवस, अंगणभर चिखल. मध्येंच कोठें तरी निसरडें. दोन-तीनदां शेळीला साष्टांग नमस्कार घातला. तरी शेळी कांहीं सांपडेना. मात्र या धांदलींत भाज्यांचे जे वाफे शिल्लक राहिले होते त्यांचाहि निकाल लागला. तसाच फुलझाडांचा ! शेळीला काय समजतें ? वाट फुटेल तिकडे ती ' में अेंऽअें ' करीत मला हुकवीत धांवत होती, आणि हर्र र्र र्र करीत मी तिचा पाठलाग करीत होतें. अखेरीस एका झाडाला तिच्या गळ्यांतील दोरी अडकली व शिकार माझ्या हातीं लागली. वा ! मीं काय लढाई जिंकली पण ! अफझुलखानाचा वध केल्यावर शिवाजीला मुद्धां आपली इतकी पाठ थोपटावीशी वाटली नसेल. तें ओलें धोतर चिखलानें भरलेल्या माझ्या सावजाच्या गळ्यांत अडकवलें आणि नाकपुड्या फेंदारीत मीं तिला ओढीत घरांत आणलें.

इतक्यांत आप्पांनीं आपल्या धोतराची ती चिखलावस्था पाहिली आणि शेळी पकडल्याबद्दल माझें कौतुक करायचें सोडून उलट धोतर मळवल्याबद्दल माझी हजिरीच घेतली. नाहीं म्हणायला आजीला जरा माझें कौतुक वाटत होतें. शेळीला बांधावयाला तिनें मला दोर आणून दिला व मी तिला माजघरांतील खिडकीच्या गजाला बांधून ठेवली.

आजी व मी दोघीहि त्या शेळीच्या मालकावर तोंडसुख घेत होतों. "दुष्ट मेला. मुद्दाम दुसऱ्याच्या बागेंत लावायचीं आपलीं जनावरे. म्हणजे खायला तेवढेंच कमीं घालावं लागतं. आतां येऊं दे तर खरा. चांगला दंड द्यायला लावतें. आपलीं जनावरं संभाळायला काय होतं ? दुसऱ्याचं नुकसान करायचं. दे म्हणावं आतां भरून. नाहींतर बांधतें नेऊन पांजरपोळांत. मग रुपाया मोजावा लागेल नाहीं माहीत. येऊं दे तर मेल्याला. आतां येईल बघ." अशी बडबड करीत मी बालडीभर पाणी शेळीसमोर आणून ठेवलं. "हो, मुक्या जनावराचे कां उगीच हाल करायचे ? मालकाला बघून घेतां येईल;

पण तिची बिचारीची काय चूक ! " असें पुटपुटत मी तिला गोंजारूं लागलें व बाईसाहेबहि माझ्या पोटरीवर आपलें डोकें लाडांत घासून ' में अेंऽअें ' करूं लागल्या. जनावरांना माणसांची परीक्षा किती लवकर होते पण !

  

' में अेंऽअें ' चा अपरिचित शब्द ऐकून आमच्या दोनहि मांजऱ्या शेपटी फुगवून पाठीची कमान करून शेळीवर व माझ्यावर डोळे वटारून गेल्या व मीहि आजीला शेळीवर लक्ष ठेवायला सांगून दिवाणखान्यांत येऊन कोचावर फिरून आडवी झालें व पुस्तक वाचूं लागलें.

दोन वाक्यें वाचलीं असतील. तोंच ' में अेंऽअें '—' में अें अेंऽ '—कर्म ! आतां कसलें वाचन. पुस्तक मिटलें व रेडिओच्या कटकटीनें 'में अें अें' ची कटकट मारून टाकतां येईल तर पाहावं म्हणून कार्यक्रम बघितला. तर दुपारची सुट्टी ! आतां काय करावं ! शेळीचें ' में अें अें ' कांहीं थांबेना. एक युक्ति सुचली. शेजारच्या बाईकडे जावं—आपल्या पराक्रमाचं वर्णनहि करतां येईल. जातांना आजीला बजावलं, " बघ शेळीचा मालक येईल. हातीपायीं पडेल. गरिबावर दया करा म्हणेल. मुळीच ऐकायचं नाहीं. निदान बारा आणे तरी टाकायला लावल्याशिवाय शेळीला हात लावूं देऊं नको. हो पांजरपोळांत एक रुपाया, तर आपले चार आणे कमी. पैसे वाजवून घेहो पण ! "

दीड तासानें आमची स्वारी परत आली. शेजारीणबाईनीं पुष्कळ कौतुक केलें. " शाबास हो तुमची. कशी पकडलीत तिला. बरं बाई सुचलं तुम्हांला आधीं फाटक लावून घ्यायचं. आतां अगदीं सोडूं नका तिला. वाईट असतात हे मेले कुणबी." प्रशंसापर शब्दांच्या जोडीला चहा–चिवड्याची साथ होती. मग काय, आम्ही अगदीं प्रसन्न होऊन घरीं आलों. येतांना फाटकांतच

' में अें अें ' ऐकूं आलें. माजघरांत आलें तों लेंड्यांचा हा थोरला सडा पडलेला.

आजीच्या उल्हासाला आतां ओहोटी लागल्यासारखी दिसली. ती म्हणाली " जळली ती शेळी. ही घाण बघ एकदां." मी म्हटलं, "अग बरंच झालं ! फुकटचं खत होईल आपल्याला. शेळीचं खत फार किंमतीचं असतं. पण कोणी विचारायला आलं होतं का ? " आजी त्रासून म्हणते, " कोणी कुत्रंसुद्धां आलं नाहीं. बाहेर नेऊन बांध तिला. मला नको ही पिडा. " मीं लगेच मोडता घातला, " बाहेर बांधली आणि कोणी हळूच तिला सोडून नेली म्हणजे ? अग आतां संध्याकाळला हात जोडीत येईल बघ तिचा मालक. त्याच्यावर काढ तूं आपला राग. " इकडे शेळीचं " में अें अें " चाललेंच होतें.

मला वाटलें तिला भूक लागली असावी. गरीब बिचारी—इतका वेळ उपाशी राहिली. बकऱ्या काय खातात बरं ? हो बाभळीच्या झाडाचा पाला आणि शेंगा. हं याला म्हणावं सृष्टिनिरीक्षण. झालं. गेलों आम्ही बाभुळ रानांत. पायांत आणि हातांत काय कांटे बोंचले आहेत म्हणून सांगूं ? या शेळ्यांना कसे बोंचत नाहींत, राम जाणे. रक्तबंबाळ होऊन थोड्याशा शेंगा आणि पाला घेऊन माघारी आलें शेळीनें तें सर्व चट्ट केलें व लेंड्याचा आणखी एक सडा घातला. अंधार पडूं लागला तरी शेळीचा मालक येईना. आजीची कुरकुर वाढतच होती, आणि शेळीच्या ' में अें अें ' लाहि ऊत आला होता.

ही इतकी कां बरं ओरडते ? खायला दिलं, प्यायला दिलं. हां समजलें— तिची दूध काढायची वेळ झाली असेल आणि कास भरून आल्यामुळें तिला होत असेल त्रास. शिवाय शेळीचं दूध पौष्टिक असतं. गांधीसुद्धां नाहीं का घेत ? झालें. दुधाची चार शेरांची कासंडी घेऊन आमच्या स्वारीनें तिच्या

ाचळाला हात लावला. तिनें जी ढुशी दिली आहे म्हणतां—शिंग डोळ्यां-
ाच जायचं. पण नशीव. गव्याला बोलावून तिचं डोचकं धरून ठेवायला
ांगिनलं आणि गुडघ्यांत कांसडी धरून चवड्यावर बसून फिरून दूध
ाढायला लागलें. तों जी लाथ बसली कमरेत, ती मी आणि कासंडी—
ोघी गेलों गडगडत स्वयंपाकघरांत. कासंडीला आला पोचा आणि मला
ालं टेंगूळ! एकूण गोळाबेरीज शून्य.

सुदैवानें आप्पा रात्रीं पत्ते खेळून उशिरां आले व सरळ निजावयाच्या
ोलीकडे जाऊं लागले. तों 'में अेंऽऽ—अें' आमचें दुर्दैव ओढवलें. "काय
ा ती विकतची कटकट अजून घरांतच ठेवली आहेस का?" "उद्यां तिला
ोहोंचवतें" म्हणून मीं त्यांची कशीबशी समजूत घातली आणि "शेळीला
ेजायला तरट दे" म्हणून हळूच आजीला म्हटलं. तर ती म्हणते कशी?
अग बोंचेल तिला तरट, तूं आपली तिला आपल्या पलंगांत निजव. एका
ुशींत मांजरे आणि दुसऱ्या कुशींत शेळी!" आतां जास्त बोललें तर
ाप्पांना ऐकूं जाईल या भीतीनें मी गुपचुप वर गेलें, आणि पांघरूण घेऊन
ेजलें. पण झोंप कुठची. माझ्या खोलीच्या बाजूलाच होतें माजघर आणि
ेथें शेळाबाई रात्रभर जप करीत बसलेल्या. आतां ठरवलं कीं सकाळीं
ालक आला कीं त्याच्या हवालीं ती शेळी करायची. दंड दिला नाहीं तरी
ाहित्तर, तोंडसुख तर घेतां येईल. सकाळीं उठून खालीं आलें तों सगळीकडे
ाण मारायला लागली होती. मीं नाकावर रुमाल ठेवीत आजीला विचारलं,
कोणी आलंय् का ग शेळी परत मागायला?" रिकाम्या अंगणाकडे बोट
ाखवीत आजी तावातावानें म्हणते, "हो! ती बघ रीघ लागली आहे
ाणसांची; हा म्हणतो माझी शेळी, तो म्हणतो माझी शेळी."

इतक्यांत शेळीनें टक्कर देऊन एक तपेलें लवंडलें. आजीचें पित्त खवळलें.
' जळ्ळं तुझं तोंड. घाण करते तर करते आणि निमूटपणें बसतहि नाहीं

अवदमा " म्हणून आजीनें तिच्या पाठीवर लाटणें ओढलें. माझें अंतःकरण द्रवले. " असें ग काय बिचाऱ्या मुक्या जनावराला ! दिवसभर माजघरांत बांधून ठेवली तर तूं तरी बसशील का स्वस्थ ! खरंच, एका जागीं बसून खुडकले असतील बिचाराचे पाय. " आजी काय माझा शब्द खाली पडूं देते ! " मग ने कीं तिला फिरायला. चांगली पावडर लाव तिच्या तोंडाला, काजळ घाल तिच्या डोळ्यांत, तुझी एखादी रेशमी साडी नेसव तिला, बूट घाल, तिच्या पायांत. "

आतां आजीशीं बोलण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें पाहून मुकाट्यानें चहा घेतला आणि बाहेर पडलें. हो, शेळीला सकाळीं खायला काय घालायचें हा प्रश्न पुढें होताच. लगेंच उत्तर सुचलें—जनावरांच्या डॉक्टरांना जाऊन विचारावें. म्हणजे सकाळचें फिरणेंहि होईल आणि सर्व माहितीहि मिळेल. डॉक्टरांना प्रश्न विचारतांच ते हंसून म्हणतात, " कां आतां शेळी पाळली आहे वाटतं ! " हा माझ्या मांजरांना टोमणा होता; पण मीं आपली सरळ झालेली हकीकत सांगितली. आणि विचारलं " शेळी काय खाते हो ? " डॉक्टर गालांतल्या गालांत हंसत हंसत म्हणतात " अहो ती खात नाहीं काय ? " मीं विचारलं, " विलायती घास खाईल का ? " " हो देशी घांस सुद्धां खाईल. " डॉक्टर माझी चेष्टा करीत आहेत, असें वाटून मी फुगून परत निघालें. येतां येतां एक विलायती घासाची पेंढी घेतली व टांगा करून घरीं आलें.

वाटेंत टांगेवाल्याला विचारलें " कायरे, शेळ्या सगळं खातात हें खरं का ? " " अक्षि समदं खातात बाई. " " डाळ तांदूळ सुद्धां. " तो म्हणतो " कां नाहीं खाणार, पर कोनी देईल तवा. " " हात्तिच्या एवढंच ना. आमच्याकडे कोठी भरून धान्य आहे ! " घरीं येतांक्षणीं तिला विलायती घास घातला आणि धान्य आणायला कोठींत गेलें. तेथें आजी होती.

नें हटकलें. " हितं काय काम आहे तुझं ? " " डाळ तांदूळ घालते ळीला. आतां खत बघ किती होईल बागेला ! " तरी आजीची कुरकुर ाहेच—" रडलं तुझं खत. दोन रुपयांचें धान्य खाईल तेव्हां दोन पैशांचं त घालील. विलायतेंत शिकलीस वाटतं हें शहाणपण ? " आम्ही निरुत्तर ालों.

इतक्यांत माझे गाण्याचे मास्तर आले. मीं तंबोरा काढला. " साऽपऽ ाऽ " सुरू झालें तों " में ए ए—में ए ए. " बोवा म्हणतात, " बागेंत ळी आली आहे वाटतं कोणाची ? " मीं खाली मान घालून म्हटलं, बागेंत नाहीं घरांतच आली आहे " आणि उठून माजघराचें दार लावून ालें. कसेंबसें गाणें एकदाचें आटोपलें. बोवा म्हणाले, " आज लक्ष नव्हतं ण्यांत. " असणार कुठून ? मधून मधून तें ' में ए ए ' घुमत होतं ना ानांत—

बोवा गेल्यावर दार लावून आंत आलें. आजी अगदीं निकरावर आली ती. " ती शेळी तरी पांजरपोळांत पोंचव नाहींतर मी तरी आपली काशीला ातें ! " आजीची काशी निघाली कीं समजावं आतां भडका उडणार. जरपोळांत पोंचवायची; मी तिला रस्त्यानें कशी घेऊन जाऊं ? हंसतील कीं क. मग टांगा करूं ? टांगेवाला हंसेल. शिवाय सकाळीं टांग्याचे पैसे खर्च ालेच आहेत. गड्याला पोंचव म्हटलं तर पोंचवील कीं नाहीं कोण जाणे. ाहींतर देईल आपली वाटेंत सोडून, म्हणजे मालकाचें आयतंच फावेल. ग तिला घरांत तरी कशी ठेवायची ? मालक तर कांहीं उगवेना. मग ापणच द्यावी झालं तिला सोडून, असं एकदां ठरवून माजघरांत येऊन ला मोकळी केली.

पण आतां ती हलेल तर शपथ ! ती सोकावली होती आयती बसून स आणि धान्य खायला. ती कांहीं जाईना. आतां शर्थ झाली. अखेरीस

गड्याकडून तिला उचलवली आणि फाटकाबाहेर सोडून फाटक लावून घेतलें. चोवीस तासांच्या आंत काय हें परिवर्तन ? शेळी बाहेर जाऊं नये म्हणून काल जें फाटक लावलें तेंच आज ती आंत येऊं नये म्हणून लावण्याची पाळी यावी. पण जन्मभर फाटक लावूनच कसं ठेवतां येईल. तें कोणीतरी कधींतरी उघडणारच. आणि तेव्हां या पाहुणाबाई आपल्या थेट माजघरांत येऊन बसत. जसं कांहीं हिच्याच बापाचं घर. आतां मात्र कहर झाला. गांधींची शेळी सुद्धां अशीच एकादी गळ्यांत आलेली शिकार तर नसेल ना !

  

आतां या शेळीच्या कचाटयांतून सुटायचें तरी कसें ? गड्यांना सगळीकडे तपास करून तिचा मालक धुंडून काढायला सांगितला. अखेरीस त्याचा पत्ता लागला माझा जीव जरा खालीं पडला. थोडीशी मानखंडना वाटत होती; पण बोलावणं धाडलं त्याला. करतां काय ? ‘ अडला हरि आणि गाढवाचे पाय धरी. ’ त्याच्याशीं बोलतांना मात्र मर्दानी आवाज काढून विचारलं, “ काय रे, तुझी शेळी नकोशी झाली वाटतं तुला ? ” तो म्हणतो कसा ? “ बाई तिचं नशीब थोर म्हणून तिनं असं थोरा मोठ्याचं घर शोधलं. तिचं कल्याण झालं अक्षी. माझ्या गरिबाच्या घरीं तिला काय मिळायचं आहे ? ”

हरि विठ्ठल ! हें लचांड गळ्यांतच येणार असा रंग दिसूं लागला. तरी उसनें अवसान आणून फिरून त्याला दरडावलं, “ अरे चोरा, बऱ्या बोलानं नेतोस कीं पोचवूं तिला पांजरपोळांत ? ”

तो शांतपणें म्हणतो—“ पोंचवाना का बापड्या. मला हो काय करायची ती. अक्षी भाकड झालीया. मी कुठून तिला खाया घालूं. आतां पावसाळ्याची गोष्ट सोडून द्या, पर एरवीं महिन्याला सबंध चार आणे खाते ती. जास्तच पर कमी नाहीं. म्या गरिबानं कुठून द्यावं बाई. तुमीच बगा. ”

तरी मला उत्तर सुचलें, " मग खाटकाला कां नाहीं विकीत ? "

खाटकाचें नांव काढतांच हात हालवीत तो म्हणतो, " छे छे पांडुरंगा! माझीं लेकरं तिचं दूध प्यालीं, तिला खाटकाला कोणच्या हातांनीं वोपूं ? असलं वंगाळ काम नाहीं आमच्या हातून कधीं व्हायचं. "

मीहि चिडलें. " म्हणून लोकांचं नुकसान करायला तिला मोकळी सोडायची वाटतं. हा चांगला धंदा. तुझ्या पांडुरंगाला अगदीं सोळा आणे पसंत नाहीं ? तुझ्या लेकरांना दूध दिलं तिनं तर म्हातारपणीं तिला खायला घाल."

" आवो, न्हाईना गरिबापाशीं. तुम्हाला कसं समजत नाहीं ? "

" खरी गोष्ट ! मलाच समजत नाहीं. हा तर नेत नाहीं. पांजरपोळांत पोंचवावी तर बिनवारशी गुराला तेथें कसें वागवतात हें ऐकून ठाऊक होतें. तिला घरांत तर ठेवतां येत नाहीं. पंचाईत झाली.

शेवटीं एक उपाय सुचला.

" कायरे, ती महिन्याचे चार आणे खातेना ? मग हा घे दीड रुपया. सहा महिन्याची बेगमी झाली बरं का. त्याच्या आधीं परत आलास तर बघ. घे ती शेळी आणि चालूं लाग. "

तो काय हंसतच दीड रुपया गोळा करून शेळीला घेऊन चालता झाला.

एकंदरींत दंडाचे बारा आणे तर बाजूलाच राहिले आणि माझ्या खिशांतलाच दीड रुपया मात्र गेला. आणखी किती जाणार आहेत तें शेळी जाणे !

# पावसाचा कोट

३

**माझ्या** वहिनीची पहिली मंगळागौर. ती पुजण्याकरितां तिला हलकेसें सोंवळें घ्यावयाचें होतें. आपल्या आईबरोबर तिनें दोन तीन दुकानें पालथीं घातलीं होतीं; पण तिच्या मनाजोगें सोंवळें कांहीं तिला मिळालें नाहीं. हें ऐकून मला त्वेष चढला. कोणचीहि गोष्ट मिळत नाहीं म्हणजे काय ? पुरता तपास केला नसेल म्हणून मिळाली नाहीं. दुसरें काय ? " चल माझ्या-बरोबर, मी तुला दहा सोंवळीं घेऊन देतें. " असें म्हणून मी तिचा हात धरून तिला बाहेर ओढूं लागलें. " दहा नको, एकच पुरे " असें तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत तिनें पायांत वहाणा घालून छत्री घेतली. मीहि वहाणा घातल्या आणि आम्ही कामाला निघालों. वहिनीला सायकलवर बसतां येत नाहीं आणि टांगा करावा तर किती दुकानें हिंडावीं लागतील कोणाला ठाऊक ? असा विचार करून पायींच जायचें ठरवलें. पहिल्यानें ×× च्या

दुकानावर हल्ला केला. कालच तेथील माल पाहिला असल्यामुळें ती नको म्हणत होती. पण मी कुठली ऐकायला. शिवाय ती आजकालची झाली, तरी पडली सासुरवाशीण; मी पडलें नणंद. नेलें मी तिला ओढीत. "अग गेली असशील, तरी तुला त्यांनीं सगळा माल दाखवला नसेल. केव्हां केव्हां आपले महाराष्ट्रीय दुकानदार असाच हलगर्जीपणा करतात आणि मग गुजराथ्यांनीं व्यापार बुडविला म्हणून शंख करतात. किती वेळां माल नाहीं असें सांगितल्यावर पेटीच्या मागें जाऊन मीं स्वतः हवा तो माल हुडकून काढला आहे. चल तूं आपली." दुकानांत गेल्यावर सोवळीं दाखवायला सांगितलीं. चळथीच्या चळथी त्यांनीं आमच्यापुढें ठेवल्या. वहिनी म्हणे, "मीं काल हें सगळं पाहिलं आहे;" खरे सांगायचें म्हणजे त्यांतलीं एकदोन सोंवळीं मला पसंत पडलीं होतीं. पण मला थोडीच मंगळागौर पुजायची होती. तसें म्हटलें तर येईल पुजतां; कारण लग्न झाल्याला हें पांचवें वर्ष आहे. हो, घटस्फोट केला म्हणून काय झालें? असो. त्या दुकानांतून आम्हीं रित्या हातीं पाय काढला. दुसऱ्या दुकानांत गेलों. तेथेंहि कोइमतुरी, बंगलुरी, म्हैसुरी वगैरे बरींच सोंवळीं हाताळलीं. कोणाचे पदर, तर कोणाचे कांठ, कोणाचा रंग, तर कोणाचा पोत तिच्या मनाला येईना. बरीच पसंती-नापसंतीची दिसते आहे बरं का आमची वहिनी. माझा भाऊ तरी पसंत पडला, नशीब! शेवटीं बुधवारांत जायचें ठरवलें. उत्तम माल तेथेंच मिळायचा. त्याच पेठेंत नाहीं का माझा जन्म झाला? तें घर मला आजीनें एकदां दाखविलें होतें आणि अजमासानें मीं तें वहिनीला दाखवलें. "चल, आतां पाहिजे त्या दुकानांत, तुझ्या आवडीचा माल मिळालाच पाहिजे, माझी जन्मपेठ आहे ही." गेलों आम्ही एका दुकानांत. आजच नवा माल आला आहे म्हणून दुकानदार म्हणाला. मला जास्तच स्फुरण चढलें. "बघ, मीं म्हटलं नाहीं." गठ्ठ्यामागून गठडीं सोडलीं; पण वहिनीचें नाक मुरडलेलेंच.

तें दुकान सोडून दुसऱ्या दुकानांत गेलों, तरी तीच रड. शेवटीं मीं चिडून तिला विचारलें, " मग तुला पाहिजे तरी कसलं सोवळं ? " तर म्हणते, " पदरांत जर नको आणि काठांत जर नको. " तेव्हां दुकानदार लागलीच म्हणतो, " बाई, एवढं उंची रेशमी सोंवळं जरावांचून कोणी काढीत नाहीं. " आणि बरोबर आहे त्याचें. उत्तम साईच्या दह्याचें श्रीखंड करायचें आणि त्यांत म्हणे केशर नको ! तरी दुकानदारानें त्यावर तोड काढली. ' कद दाखवूं का ? ' पण कदाचा ठराविक रंग तिला आवडेना असें होतां होतां आमची सगळी जन्मठेप, नाहीं जन्मपेठ पालथी घातली, व रविवारांत जायचें ठरवलें. वाटेंतच एका दुकानांत पावसाचे कोट टांगलेले दिसले. मला एक घ्यायचाच होता. मी लगेच आंत शिरलें. पावसाचा कोट पाहिजे आहे म्हटल्यावर त्यानें ठराविक खाकी रंगाचा कोट पुढें केला. मीं त्याकडे बघायचें सुद्धां नाकारलें. " खाकी आणि तपकिरी रंग आपल्या कातडीला शोभत नाहींत. साहेब घालतो म्हणून उगीच आपण घालायचा कीं काय ? आपल्या रंगरूपाचा विचार नको का करायला ?" " मग कसला रंग दाखवूं ? " म्हणून त्यानें नम्रपणानें विचारलें. " तपकिरी आणि खाकी खेरीज कोणचाहि दाखवा " असें मीं त्याला सांगितलें. त्यानें एक तांबड्या व पांढऱ्या चौकटीचा कोट दाखवला. मीं तो वहिनींच्या अंगावर चढवला व दूर उभी राहून तिला घिरट्या घालायला लावून पाहूं लागलें. कोट होता सुंदर, पण तो वहिनीच्या अंगावर ! माझ्यासारख्या तेहतिशीच्या पुढें गेलेला ढेपसा बेढबच दिसला असता त्या कोटांत. तेव्हां त्याला जरा थोड्या म्हाताऱ्या रंगाचे कोट काढायला सांगितलें. आणि नवल हें कीं त्याच्याजवळ होतेहि तऱ्हतऱ्हेचे. प्रत्येक कोट वहिनीच्या अंगावर चढवून दूर उभी राहून मी तो पाहीं. अखेरीस एक माझ्या पसंतीला आला. पण मला तो घट्ट होऊं लागला. तेव्हां दुकानदार जरा बुचकळ्यांत पडला. " कोट पाहिजे कोणाच्या

अंगाचा ?—तुमच्या कीं यांच्या ?" "अहो, माझ्या अंगचा. पहिल्यानंच नाहीं का सांगितलं ?" "पण यांच्या अंगावर सर्व चढवीत होतां तेव्हां वाटलं माझी ऐकण्यांत चूक झाली असेल." "अहो, माझ्या अंगावर कोट घालून तो कसा दिसतो हें मला कसं हो समजेल ? दुसऱ्याच्या अंगावर एखादी वस्तु पाहिली म्हणजे तिची बरोबर कल्पना येते. अंगावर कपडे घालून त्यांचं सौंदर्य गिऱ्हाइकांना दिसावं म्हणून पगार देऊन युरोपांतून मॅनिकिन्स् ठेवतात. माहीत आहे ?" पण माझें चऱ्हाट तो कुठें ऐकत होता. माझ्या मापाचा कोट आणायला तो गेला होता आंत. कोटाची किंमत काय असेल याचा विचार करीत मी वहिनीकडे पाहत होतें. इतक्यांत तो कागदी पेट्यांची एक भली मोठी चळथ घेऊन बाहेर आला व म्हणतो, "आपल्या मापाचा बरोबर असलाच कोट नाहीं. पण आपल्या अंगचे हे दुसरे कोट आणले आहेत. फिरून वहिनीबाईंची कोट काढण्याची व घालण्याची आणि गिरकी मारण्याची कसरत सुरू झाली. दुकानाच्या बाहेर हळू हळू गर्दी जमूं लागली. होतां होतां एक किरमिजी रंगाचा लहान लहान पांढरे ठिपके असलेला कोट मला पसंत पडला. वहिनीच्या अंगावरून काढून मीं तो घातला. तो होता माझ्याच अंगाचा, तरी पण दोन तीन बटणें जरा सैल करून घ्यावीं लागलीं. कोटाची किंमत बरीच असेलसें वाटले होतें; परंतु त्यानें काय तो सहाचाच आंकडा कागदावर खरडला, तेव्हां इतके उंची व नवीन पद्धतीचे कोट इतक्या स्वस्तांत विकायला कसे परवडतात म्हणून मीं प्रश्न केला. त्यावर दुकानदारानें सांगितलें कीं, हे असले रंगीबेरंगी कोट गांवांत मुळींच खपेनात, तेव्हां निम्म्या किंमतीला विकायला काढले आहेत. "कसे खपणार ? आमची पुण्याचीं मेंढरं सगळीं एक जात खाकी कोटाची मागणी करणार. आणि अजून बायका तर कोट घालूंच लागल्या नाहींत. पण मला एकदां हा रंगीत कोट घालून भर पावसांत मिरवूं दे, कीं पहा लगेच तुमच्या दुकानावर बायकांच्या

कशा उभ्या पडतील त्या. " "असं झालं तर देवच पावला" म्हणून तो आशेनें म्हणाला. लगेच त्याला आश्वासन देत मीं म्हटलें "अहो, या पुण्यांत मीं अनेक चाली सुरू केल्या आहेत. सायकलवर बसणं, पाठीवर शेपटा सोडणं, तसेंच आतां हे रंगीत कोट करतें बघा सुरू. पण प्रत्येक कोटावर माझे पांच टक्के बाजूला काढून ठेवले पाहिजेत बरं का?" असें गंमतीनें म्हणत मी बाहेर पडलें. असो. एक तरी गोष्ट मनासारखी झाली. वहिनीचें सोंवळें नाहीं तर नाहीं. पावसाचा कोट तर मनासारखा मिळाला! आतां कालपरवांसारखं पावसांत भिजायला नको, असा विचार करीत हातावर कोट टाकून घरीं जायला निघालें. "सोंवळीं बघायला रविवारांत नाहीं का जायचं?" म्हणून वहिनींनीं विचारतांच म्हटलं, "अग तीन तास होऊन गेले भटकतों आहों. शिवाय आणखी पन्नास दुकानं हिंडलों, तरी तुझ्या मनासारखं सोंवळं मिळेलच असं कुणीं सांगावं? नाहीं तर मी बघ. कशी गेलेल्या दुकानांत काम फत्ते करून आलें ती. चल आतां, घरींच जाऊन सर्वांना कोट दाखवूं." आम्ही घरीं आलों. सर्वांकडून मीं माझ्या कोटाचं कौतुक करवून घेतलें. संध्याकाळीं कोट हातावर लटकावून फिरायला गेलें; पण त्या दिवशीं आकाश अगदीं निरभ्र होतें; तेव्हां कोट घालण्याचा प्रसंगच आला नाहीं. दुसऱ्या तिसऱ्या दिवशीं तीच कथा. रोज आपले कोट घेऊन आकाशाकडे पाहत फिरायला जावें, पण एखादा ढग माझ्या कोटाकडे दयार्द्र दृष्टीनें पाहील तर शपथ! पाऊस नाहीं म्हणून शेतकऱ्यांचे डोळे पांढरे होऊं लागले. माझीहि तीच अवस्था! इतक्या हौसेनें कोट घेतला, आणि शिवाय पुण्यांत कोटाची चाल पाडतें म्हणून तोऱ्यानें त्या दुकानदाराला सांगितलें; पण पाऊसच येईना त्याला काय करावें? पावसाशिवाय का तो अंगावर चढवतां येतो? तरी मुद्दां एक दिवस वारें जरा जास्त सुटलें होतें व थंडी वाजूं लागली म्हणून घातला कोट अंगांत व ऐटींत घरीं येऊं लागलें, तर

वाटेंतलीं कॉलेजांतील कांहीं कारटीं "काय मुसळधार पाऊस पडतो आहे! भिजून गेलों बुवा अगदीं!" म्हणून मला ऐकूं येईल अशा बेतानें आपसांत बडबडूं लागलीं. दांतओंठ खात, पाय आपटीत झपाझप पावलें टाकीत आणखी पुढें गेलें, तर दुसरें एक पोरांचें टोळकें "एक–दोन, एक–दोन" करीत माझ्या चालण्याचा ताल धरूं लागलें. नुसती टवाळी करायला सांगा हल्लींच्या पोरट्यांना. एकाला अंग धरून ताठ चालतां येत असेल तर शपथ. सगळीं जशीं चिंध्यांचीं बाहुलीं. मला एकदोन करताहेत आपल्या डोंबल्याचीं! असो. एकंदरींत जरा चरफडतच घरीं आलें व आतां तो कोट घेऊन फिरायला जायचें नाहीं म्हणून कानाला खडा लावून घेतला, तर दुसऱ्या दिवशीं गांवांतून परत येतांना पाऊस पडूं लागला. मीं धांवतच घरीं येऊन कोट चढवला आणि बाहेर पडलें तों सूर्यनारायण कृष्ण मेघांना यःपलाय करीत होत्साते गगनांत फिरून विराजूं लागले. नशीब त्या कोटाचें, दुसरें काय? फिरून पावसाचा मागमूस नाहीं. काठेवाडांत दुष्काळ पडला, महाराष्ट्रांत तींच चिन्हें दिसूं लागलीं. आतां माझ्या कोटाचें कसें होणार! कोट घालून टिळक तलावांत उडी घेऊं का? करूं तरी काय? मनुष्यानें वीज आपल्या ताब्यांत आणली, पाऊस कां नाहीं आणला? किल्ली फिरवून पाऊस पाडतां येता तर काय मजा झाली असती? हो खरंच; हल्लीं नवीन पद्धतीच्या मोऱ्यांतून किल्ली फिरवली की डोक्यावर हजाऱ्यांतून पाणी पाडतां येतं, आणि माझ्या चुलत्यांच्या नव्या घरीं त्यांनीं अशी सोय करून घेतली आहे. मग काय, मी पळत वर जाऊन कोट घेतला व सरळ चुलत्यांच्या घराचा रस्ता धरला. घराशीं येतांक्षणींच मी कोट अंगावर चढवायला सुरवात केली. इतक्यांत काकू दारांत आली आणि म्हणते, "अग, शुद्धीवर आहेस का मुली? घरांत आल्यावर का कोणी छत्री उघडतं?" मी कांहींच उत्तर न देतां तडक मोरींत गेलें आणि हजाऱ्याची तोटी भरपूर जोरानें सोडून

खालीं जाऊन उभी राहिलें. अहाहा ! काय ब्रह्मानंद वाटला म्हणून सांगूं ? डोकें असें थंड झालें, कीं बस्स ! पावसाची नाहीं तर नाहीं, पण पाण्याची आणि कोटाची तर गांठभेट झाली ! मन सुप्रसन्न होऊन मी फवाऱ्याखालून बाहेर येतें तों माझे काका काकू आणि झाडून सारीं चुलत भावंडें मोरीच्या दारांत येऊन कोणी हंसत तर कोणी विस्मयानें माझ्याकडे पाहत उभीं होती. अखेरीस काका गरजले, " हें ग काय गाढवी ? भिजलीस बघ किती ती " भिजलें होतें खरीच. कारण डोक्यावर पडलेलें पाणी थेट कपड्यापर्यंत जाऊन पोहोंचलें होतें. पण त्याची काय कथा ? कोटावर पाण्याच्या धारा तर पडल्या कीं नाहीं ? " काय तुला वेड बीड लागलं आहे कीं काय ? " म्हणून काकांनीं फिरून विचारलें. " आली होती खरी पाळी; कोट घेतल्यापासून पावसाचा पत्ता नाहीं, मग वेड लागेल नाहीं तर काय ? " म्हणून मीं उत्तर दिलें. पोरें फिदीफिदी हसूं लागलीं. " म्हणून भर कपड्यानिशीं हजाऱ्याखालीं स्वतःला भिजवून घ्यायचें होय ? हा अवतार बघायला बोलावूं का आतां आप्पाला ? " म्हणून काकांनीं धमकी घातली. " बोलावीनात बापडे ! माझ्या कोटाची तळ मळ या रुक्ष परांजप्याना कशी कळणार " " हें बघ शकू, तो कोट काढ; साडी सोड आणि मी हें देतें तें पातळ नेस. " म्हणून काकूनें एक पांढरे पातळ माझ्यासमोर केलें. शिव शिव ! आजकाल जुन्या-जुन्या बायकासुद्धां भरल्या संसारांत हीं सुतक्यासारखीं अवलक्षणी पांढरीं पातळं कशीं नेसतात. राम जाणें ! कपाळें पांढरीं व्हायचीं असल्या लक्षणांनीं ! असो. मी घरीं आले नि पत्राची पेटी उघडून पहातें तों मुंबईहून मामाचें पत्र आलें होतें. त्यांच्याकडे सत्यनारायण होता आणि मी हजर राहिलेंच पाहिजे म्हणून ताकीद केली होती. बस्स, ठरलं जायचं. इथं राहून तरी आपली कुचेष्टाच करून घ्यायची कीं नाहीं ? शिवाय मुंबईला बराच पाऊस पडतो नेहमीं. तेव्हां कोटाचेंहि पारणें फेडतां येईल कदाचित् ! झालें झुक् झुक् करीत आम्ही

पोहोंचलों मुंबईला. स्टेशनवर मामा आला होता. पाऊसही पडत होता. आणि त्याचें घर जवळ असल्यामुळें आतां एकदाचा कोट घालून पावसांतून मिरवायला मिळेल, या आशेनें मी तो घालूं लागलें, तों मामानें माझ्या हातांतून हिसकावून घेतला आणि म्हणतो, "आतां काय करायचा कोट? तुझ्याकरतां मोटर बघ कशी फक्कड आणली आहे ती." "तूं मोटर आणली आहेस?" "हो, हो, भाड्याची नाहीं. खास अस्मादिकांची; आजच घेतली विकत. आतां बोल, तुला कुठं कुठं हिंडवूं ती?" आतां काय करणार! घर फिरायला लागलें म्हणजे वांसेहि फिरूं लागतात, नाहींतर आजच मोटर विकत घ्यायची दुर्बुद्धि मामाला कां होती? माझा एक शब्दहि कधीं खालीं पडूं न देणाऱ्या माझ्या लाडक्या मामानें सुद्धां आज माझें मन दुखवावें ना? प्रारब्धापुढें कोणाचें काय चालणार? मी चार दिवस मुंबईत राहिलें. एक तासभर पाऊस उघडला असेल तर शपथ! पण उपयोग काय? मामानें माझें आणि मोटरचें लग्न लावून टाकलें होतें. अखेरीस कंटाळून मी पुण्यास परत आलें. खडकीलाच पावसाची मोठी सर आली. माझा आनंद गगनांत मावेना. आतां भांबुर्ड्याला कोट घालूनच उतरावें म्हणून कोट पाहूं लागलें तर कोट होता कुठें? तो राहिला मुंबईला. हरि विठ्ठल! आतां मात्र मुळामुठेंत उडी घ्यावीशी वाटली; पण कोटाला मागें ठेवून एकटीनें जीव तरी कसा द्यायचा? फिरला बेत. घरीं आलें आणि कोट विसरल्याचें मामाला पत्र लिहिलें. तो दोनतीन दिवसांनीं पुण्याला येणार होता. तेव्हां कोट बरोबर घेऊन येतों म्हणून त्यानें कळवलें. तेवढ्या अवधींत रोज संध्याकाळीं तब्बल तीन तास पावसाची झड लागे. आणि मी खिन्न मनानें तिच्याकडे पाहत बसें. रामसुद्धां सीतेच्या विरहानें इतका वेडा झाला नसेल. चवथ्या दिवशीं मामा आला; पण पाऊस! कोटाला पाहतांक्षणीं पावसानें काय केलें तें काय आतां सांगायला पाहिजे! तो बंद झाला, तो आजपर्यंत! देवा, शत्रूवरही असा प्रसंग आणूं नकोस!

नोव्हेंबर १९३९

## मुके सोबती ४

जनावरें कशाला बाळगायचीं ? फुकटचा त्रास मात्र होतो असे उद्‌गार वारंवार कानीं येतात. त्यांना उत्तर म्हणून मी वेगवेगळ्या प्राण्यांच्या उपयुक्ततेची नामावळी देत बसणार नाहीं. " आम्हांला मुलें आवडत नाहींत. " " मुलांची कटकट हवी कशाला " असें म्हणणारीं माणूसघाणीं माणसेंहि या जगांत आहेतच! त्यांना काय " मानव जात नष्ट होऊं नये याकरितां मुलांची जरूर आहे " असें उत्तर द्यायचें ? गृहिणीखेरीज गृहाला, मुलांखेरीज कुटुंबाला, जशी शोभा येत नाहीं तशी मुक्या जनावरांखेरीज संसाराला शोभा येत नाहीं, असें मी म्हणेन. लहान मुलांबरोबर तासन् तास गप्पा मारीत बसणाऱ्या मंडळींत ज्याप्रमाणें कांहीं विशेष प्रेमळपणा, सौजन्य, मनाचा मोठेपणा आपणांस आढळतो, त्याचप्रमाणें जनावरांची आवड असणाऱ्या मंडळींत एक विशेष प्रकारची माणुसकी असते, असें आपणांस दिसून येईल. जनावरें

मुकीं असतात, त्यांना आपल्या भावना व्यक्त करतां येत नाहींत तेव्हां त्यांशीं हितगुज करूं शकणाऱ्या मंडळीचें मन आणि हृदय हीं विशेष भावनाशील असलीं पाहिजेत हें उघड आहे. अशा लोकांना जनावरांवर प्रेम केल्यावांचून राहवतच नाहीं. हौसेनें बाग करणाऱ्या लोकांविषयींहि असेंच म्हणतां येईल. तीं रस्त्यानें जातांना तासचे तास एकाद्या सुंदर बागेकडे पहात राहतील किंवा फुलाचा ऊर भरभरून वास घेत राहतील. त्यायोगें विश्रांति मिळते, आनंद होतो.

  

कृत्रिम रीतीनें वाढवलेलीं फुलें व माणसाळलेलीं जनावरेंसुद्धां, मनुष्यप्राण्यापेक्षां निसर्गाच्या कितीतरी जवळ आहेत. त्यांच्याशीं गुजगोष्टी केल्यानें अकृत्रिम समाधान होतें. केवळ धंद्याचेच ज्ञान करून घेतल्यानें जिज्ञासू वृत्तीच्या माणसाची जशी तृप्ति होत नाहीं तशी मोठ्या हृदयाच्या माणसाची भूक केवळ आप्तेष्टांवर किंवा फक्त मनुष्यप्राण्यांवर प्रेम केल्यानें भागत नाहीं. प्रसिद्ध इंग्रजी गणिती न्यूटन आपल्या विषयांत सदा इतका बुडलेला असे कीं, त्याला लग्न करून संसार सुद्धां कधीं थाटावासा वाटला नाहीं, पण त्यानें जवळ एक कुत्रा व एक मांजरी मात्र बाळगली होती. त्याच्या कुत्र्यानें दिवा लवंडल्यामुळें त्याचे महत्त्वाचे कागद एकदां जळाले होते. पण न्यूटन त्या कुत्र्यावर यत्किंचित्‌हि न रागवतां जळालेले सिद्धांत फिरून लिहून काढण्याच्या तयारीला लागला. त्याच्या मांजरीचीहि गोष्ट प्रसिद्ध आहे. तिला एकदां पिलें झालीं तेव्हां मायलेकरांना खोलींत येण्याजाण्याकरितां न्यूटनला पन्नास वेळां दार उघडावें लागे. हा त्रास चुकविण्याकरितां त्यानें भिंतीला मांजरीकरितां एक मोठें व पिलाकरितां एक लहान भोंक पाडलें. कांहीं वेळानें मांजरी मोठ्या भोंकानें आंत आली व पिलें तिच्या मागोमाग मोठ्याच भोंकां-

तून आंत आलीं. तेव्हां न्यूटन म्हणाला, " फुकट माझें ज्ञान ! ज्या भोंकांतून मांजरी येऊं शकते त्यांतूनच पिलें येऊं शकतील एवढी साधी गोष्टसुद्धां माझ्या ध्यानांत आली नाहीं ! पिलांकरितां वेगळें भोंक पाडण्याची काय जरूर होती ? "

  

**बायरन्** या कवीचेंहि एक मोठें लाडकें कुत्रें होतें. तें मेल्यावर बायरनूला अत्यंत दुःख झालें. त्यानें त्याचें थडगें बांधून त्यावर एक सुंदर मृत्युलेखहि लिहिला आहे. ग्रीसचा दिग्विजयी राजा अलेक्झँडर याचें आपल्या ब्यूसेफॅलस नांवाच्या घोड्यावर निरतिशय प्रेम होतें, व त्यानें पंजाबांतील एका गांवाला ब्यूसेफॅलिया हें नांव दिलें आहे. आपल्याकडे केवळ आवडीखातर जनावरें पाळण्याचीं फारशी पद्धत नाहीं. जीं जनावरें आपल्या उपयोगीं पडतात तीं आपण बाळगतों, त्यांत कांहीं गैर आहे असें नाहीं. पण त्या जनावरांवरसुद्धां प्रेम करतां येतें. दुधाकरितां गाई, म्हशी, टांग्याकरितां घोडा, राखणीकरितां कुत्रें आणि उंदरांकरितां मांजर आपण बाळगतों. परंतु काम देणारीं सजीव यंत्रें यापलीकडे त्यांची वास्तपुस्त आपण करीत नाहीं. फार काय लहान मुलांनाहि त्यांच्याशीं निर्दयपणे वागवण्यास शिकवितों. कांहीं कारण नसतांहि " ठोक माऊला " " मार–भु–भूला " अशी शिकवण कितीतरी कुटुंबांतून लहान मुलांना दिली जाते. याचें प्रत्यंतर पहावयाचें असलें तर रस्त्यांतलीं पोरें कुत्र्यांच्या किंवा मांजरांच्या अंगावर विनाकारण धोंडे किती वेळां मारतात हें पहावें. ही लहान जनावरांची स्थिति झाली. गाई, म्हशी, बैल, घोडे यांविषयीं अगदीं याच्या उलट शिकविलें जातें. " जवळ जाऊं नको, मारील " हें वाक्य किती वेळां आपल्या कानीं येतें ! त्यायोगें मुलें भित्रीं होतात व मोठ्या जनावरांपासून चार हात दूर रहातात.

खरोखर पाहिलें असतां मुलांना प्राण्यांवर प्रेम करायला शिकवून भूतदयेचें तत्त्व लहानपणींच त्यांच्या कोमल मनांवर किती सुलभ रीतीनें बिंबवतां येईल! तें सोडून आपण त्यांना निष्ठुर आणि भ्याड बनवतों. मुलांच्या सरळ मनाला प्राण्याचें अकृत्रिम वर्तन कितीतरी मोहून टाकील. आतां कांहीं गाई म्हशी मारक्या असतील. परंतु आपण त्रास दिल्याखेरीज कोणतेंहि जनावर सहसां आपल्या वाटेस जात नाहीं आणि घरांतील मुलांनीं त्रास दिला असतांहि कित्येक वेळां जनावरे त्यांच्या वाटेस जात नाहींत. एकदां एक पाळलेला हत्ती पिसाळून सर्वत्र धुमाकूळ घालीत होता. तेव्हां त्याच्या माहुताच्या बायकोनें रागानें आपलें मूल त्याच्यापुढें आणून टाकलें व "यालामुद्धां मारून टाक" असें म्हटलें. तत्काळ तो हत्ती भानावर येऊन शांत झाल्याची हकीकत मीं वाचली आहे. म्हैस हें जनावर आपण निर्बुद्ध समजतों. पण माझ्या माहितीच्या एका गृहस्थावर त्यांच्या म्हशीचें विशेष प्रेम होतें. ते गृहस्थ रोज सकाळीं टेंकडीवर एका मैलावर असलेल्या खंडोबाला धांवत जात असत. त्यावेळीं ही म्हैस मोकळी असली तर 'वांय् वांय्' करीत शेंपटीचा गोंडा हवेंत पतंगाप्रमाणें उडवीत टणाटण उड्या मारीत त्यांच्या पाठीमागें धावत जाई. म्हैस हा प्राणी अतिशय समाधानी आहे. सुखाच्या परमावधीला पोहोंचलेले प्राणी जर कोणाला पाहावयाचे असतील तर तोंड वर करून चिखलांत बसलेल्या म्हशींकडे पहावें. पूर्वी आमचें येथें दुभत्याकरितां पुष्कळ गुरे असत. त्यांचें सर्व काम करणारा कोंकणी गडी राघू हा प्रथम आजोबांकडे होता. आप्पांना त्यानें कधीं कधीं खांद्यावरूनसुद्धां शाळेंत पोहोंचवलेलें आहे. मुलांचें आईवर नसेल इतकें या गुरांचें राघूवर प्रेम होतें. तोहि त्यांच्यावर आईच्यावर ताण ममता करीत असे. अर्धापाऊण तास तो जर कुठें दिसला नाहीं तर तीं कावरींबावरीं होऊन 'वांय् वांय्' करूं लागत. मग तो जेव्हां "येतांव हो पंडये. वाईच तमाखू खाऊन

येतांव " असें म्हणे तेव्हां तीं शांत होत. दर वर्षी तो महिनाभर आपल्या गांवीं जाई, तेव्हां पहिले कांहीं दिवस गुरे विलक्षण आकांत करीत. दोन-तीन दिवस नीट पान्हावतच नसत. त्यांना फसविण्याकरितां कोणीतरी राघूची तांबडी गोंड्याची टोपी घाली, तेव्हां तीं थोडा वेळ धार सोडीत, पण आमची लबाडी ध्यानांत येतांच फिरून पान्हा आंखडीत. राघू त्यांना रानांत चरायला घेऊन जात असे. गुरे चांगलीं दांडगीं आणि माजलेलीं होती. हा अंगानें अगदीं फाटका. तो हातांत तीन हिरकुटांएवढी एक काठी घेऊन त्यांना वळवीत असे. ती लाडावलेलीं गुरं दांडगाई करीत, नको तेथें शिरत तेव्हां " म्होठी गुलामाची म्हैस ती. हाइक " असे लाडानें पुटपुटत तो त्या बारक्या काठीनें त्यांना डवची. एक दिवस मी त्याला म्हटलें "एवढी बारीक काठी रे कशाला घेतोस ? मोठी घेना. " त्यावर तो म्हणतो, " नाय् गो बाबी. राग यतो यकांद येली. काठी न्हान असली मंजी लागायचा भ्या नाय् ? " राग येण्याची राघूला कशाला भीति वाटत असे कोण जाणें ? उभ्या वीस वर्षांत मीं त्याला कधीं रागावलेले पाहिलें नव्हतें. तो मेल्यावर आम्हांला गुरें घरीं ठेवावींशीं वाटलीं नाहींत.

  

पुण्याच्या लॉ कॉलेजचे प्रिन्सिपॉल श्री. नानासाहेब घारपुरे यांची गोविंदा गोपाळ नांवाची एक बैलाची जोडी आहे. दोन्हीं जनावरे अगदी मस्त आहेत. झुंज लावली तर कोणाला हार जायची नाहींत. नानासाहेबांचा घोगरा आवाज त्यांना दोन मैलांवरहि ऐकूं येतो, व तो कानीं येतांच दोघेहि धांवत त्यांना भेटायला येतात. या जोडींतला गोपाळ हा अस्सल सिंधी आहे, व गोविंदा इकडला आहे. वयांत आल्यावर गोविंदानें रीतीप्रमाणें अनेक संसार थाटले; परंतु गोपाळराव गोविंदापेक्षां कितीतरी

धिप्पाड व देखणे असूनही एकासुद्धां गरीब गाईकडे पाहीनात. इतकेंच नव्हे तर कोणी हट्टानें आपली गाय हनुमान टेकडीकडे वळवलीच तर तिच्यावर शिंगें रोखून हे ब्रह्मचारी तिला तेथून हुसकून लावीत. न जाणो नानासाहेबांच्या हनुमान टेकडीचा हा प्रभाव असेल ! अशा रीतीनें कांहीं वर्षें गेलीं. एकदां कोणातरी एका भल्याभक्कम सिंधी गाईचा मालक गोपाळ-रावांची जातपात ऐकून वरसंशोधनार्थ तेथें आला. त्या दिवशीं गोपाळ-रावांनीं जरी सरळ रुकार दिला नाहीं तरी नेहमींच्या तामसी पद्धतीप्रमाणें तिला हाकलून मात्र लावलें नाहीं. जनावरांतसुद्धां जातिनिष्ठा किती आहे पहा ! त्या दिवशींचें गोपाळरावाचें सौम्य वर्तन पाहून दोहींकडचे वऱ्हाडी उभयतांना टेकडीवर सोडून घरीं परतले. दुसऱ्याच दिवशीं गोपाळराव गृहस्थाश्रमी झाले. नानासाहेबांना फार आनंद झाला, व आतां हा आपला वृषभपुत्र गोविंदाप्रमाणें अनेक संसार थाटील अशी आशा त्यांना वाटूं लागली, परंतु ती प्रथम वधू गेल्यावर गोपाळ फिरून कोणाकडेही पाहीनासा झाला, व त्या दिवसापासून त्यानें जें कडकडीत ब्रह्मचर्यव्रत पाळलें आहे तें आजपर्यंत. नानासाहेबांचाच मानसपुत्र तो !

घोडा हें जनावर अतिशय इमानी व अतिशय प्रेमळ असतें. एकदां सरदार बिवलकरांची पांढरी घोडी मोतद्दाराबरोबर माझ्या दारावरून जात होती. सरदारांची व माझी ओळखहि नाहीं. परंतु तिच्याशीं बोलण्याचा मोह मला आवरेना. तेव्हां तिला थोडें थोपटून गोंजारून मीं तिला थोडा गूळ खावयास दिला. त्यानंतर दोन तीन वेळां घरावरून जातांना मी किंवा माझी मुलगी तिला गूळ अथवा ओला हरबरा देत असूं. एकदां ती मला रस्त्यांत भेटली. तेव्हां ती कांहीं केल्या मला सोडीना. आपलें मखमाली नाक सारखें माझ्या दंडांवर व हातांवर घासूं लागली. अखेरीस एका दुकानांतून तिला गूळ घेऊन दिला, तेव्हां माझी सुटका झाली.

घरांतल्या लहान मुलांवर व मांजरांवर घोडीं अतिशय प्रेम करितात. एका घोडशाळेंतील एका घोड्याचें व एका मांजरीचें फार सख्य होतें. घोडें तबेल्यांत आलेंरें आलें कीं मांजरी टुणकन् त्याच्या पाठीवर चढून बसायची. तें घोडें शाळेंत कामाला गेलें कीं, ही मांजरी शाळेंतील एका खिडकींत बसून त्याच्याकडे बघत रहायची. तें तबेल्यांत आलें कीं फिरून उडी मारून पाठीवर बसायची. एक दिवस मी सकाळीं तबेल्यांत आलें तो हिनें त्याच्या चारी पायांच्या मधल्या जागेंत पिलें घातलीं होती. घोडयाच्या पायाखालीं तीं चेंगरतील अशी मला भीति वाटली, तेव्हां शाळेचा मालक म्हणतो, " घोडें भरधांव पळत असतां त्याच्यापुढें तान्हें मूल आणून टाका; त्याला घोडयाच्या पायाचा स्पर्शसुद्धां होणार नाहीं. " आणि खरोखरीच अशी गोष्ट एकदां खुद्द पुण्यांतच घडली आहे. कै. हरिभाऊ आपटे यांच्या गाडीचें घोडें एक दिवस भरधाव जात असतां रस्त्यावर एक मूल त्याच्या पायांत आलें. इतक्या वेगांत असतांहि घोडें तात्काळ थांबलें आणि मूल त्याच्या पायाच्यामध्यें जरा घाबरून टकमक पाहत होतें. यावरून घोडयाच्या अकलेची व प्रेमळ-पणाची साक्ष पटते. त्यानें स्वतः मुलाला तुडवलें नाहीं, इतकेंच नाहीं, तर गाडी अंगावरून जाऊं नये म्हणून एकदम आपला वेग आवरून तो तेथेंच थांबला. तात्यांचें ( हरिभाऊंचें ) ह्या घोडयावर फार प्रेम होतें हें सांगावयास नकोच. म्हातारें झालें तरी मरेपर्यंत त्यांनीं या घोडयाला अंतर दिलें नाहीं. घोडीं दहा वर्षांनींसुद्धां माणसाला ओळखतात. घोडयावरून जातांना रानांत कुठें वाट चुकली तरी लगाम घोडयाच्या मानेवर ठेवावा. तें सरळ आपल्याला घरीं आणतें.

घोडयाप्रमाणेंच कुत्रींहि अतिशय प्रेमळ व इमानी असतात. तात्यांचाच डिक् (*Dick*) नांवाचा एक स्पॅनियल् कुत्रा होता. तात्या गेल्यावर तो हाय खाऊन मेला. त्यांच्या मरणानंतर त्यानें अन्नपाण्याला स्पर्शसुद्धां

केला नाहीं. आनंदाश्रमांत अजूनहि गेलें कीं तात्यांची आणि दाराजवळ नेहमीं बसणाऱ्या डिक्वी आठवण होऊन कसेंसेंच होतें. परंतु यावरून सर्वच कुत्रीं इतकीं इमानी असतात असें नव्हे. फार काय, तात्यांचेंच ' हुजूर ' नांवाचें दुसरें एक कुत्रें होतें. त्याला मालकाच्या निधनाची वार्ताहि नव्हती. तात्या गेल्यावर आम्हीं त्याला घरीं आणलें. त्यानें एकदांहि तात्यांची आठवण काढली नाहीं. एक दिवस तें नाहींसें झालें. सुमारे एक आठवड्यानें तें एका पठाणामागें मोकळेंच जात असलेलें दिसलें. " हुजूर हुजूर " म्हणतांच तें जवळ आलें व चाटूं लागलें. पठाणानें शीळ घालतांच तें त्याच्या बरोबर गेलें. एकाच जातीच्या जनावरांत सुद्धां किती प्रकारचे मासले पहावयास मिळतात. माणसांतहि इतके आडळणार नाहींत !

  

वाघ, चित्ते, लांडगे वगैरे हिंस्र पशूंनासुद्धां पाळणारे हौशी लोक आहेत. कोल्हापूरचे शाहूमहाराज हेहि त्यांतलेच एक होते असें सांगतात. बायरन्नेंहि एक अस्वल व एक लांडगा पाळला होता. साप पाळणारीहि मंडळी आहेत. परंतु कोणतेंहि जनावर पाळायचें म्हणजे त्याच्यावर नुसतें प्रेम करून भागत नाहीं. त्याची व्यवस्थाहि नीट ठेवावी लागते, योग्य तें व योग्य त्या वेळीं खाणें, जरूर तितकी विश्रांति, अवश्य तेवढा व्यायाम वगैरे सर्व गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतें, तरच जनावरें सुस्थितीत राहतात. फार काय लहान मुलांपेक्षांहि जनावरांची फार काळजी घ्यावी लागते. कारण ती मुकीं असतात. घरांतील मुलांकडेहि हें काम सोंपवतां येतें, व तें तीं मोठ्या हौसेनें करतात. जनावरांना खायला घालणें, त्यांना फिरायला घेऊन जाणें, त्यांना आंघोळ घालणें ह्या सर्व कामांत हातभार लावतांना मुलांनाहि मोठेपणा दिसल्यासारखा होतो. अर्थात् त्यांच्यावर देखरेखही ठेवावीच लागते.

नाहींतर ' बालमित्रां 'तील "मैना घ्या हो मैना" सारखी अवस्था व्हायची ! आपल्या इकडे पुष्कळ लोक कुत्रीं बाळगतात. त्यांना वाटेल तें व वाटेल त्यावेळीं खायला देतात. त्यांना कधीं अंघोळ घालीत नाहीं. त्यांना रोगी कुत्र्यांच्या संगतींत हिंडूं देतात. मग कांहीं दिवसांनीं त्या कुत्र्याला गोचिड्या, गोमाशा, लूत, खरूज इत्यादि नानाप्रकार होतात. बरें इतकें झाल्यावर मग तें कुत्रें मारून टाकावें पण तेंहि करीत नाहींत. कारण तेथें धर्म आडवा येतो. पण गांवभर भटकत फिरणाऱ्या कुत्र्यांना धोंडे मारलेले, काठीनें बडवलेलें मात्र धर्मात चालतें. यावरून गत वर्षी माझ्याच घरीं घडलेली एक हकीकत सांगावीशी वाटते. माझ्या दोन्ही मांजऱ्या व्याल्या. एकीचीं पोरें सुंदर होतीं आणि त्यांना ताबडतोब मागण्या आल्या. पण दुसरीचीं पोरें कुरूप होतीं व कोणालाहि तीं नको होतीं. तेव्हां मीं त्यांना बुडवून टाकावयाचें ठरवलें. त्याबरोबर माझ्यावर ' निर्दय, क्रूर, शून्यहृदय ' वगैरे मोठमोठे आरोप झाले. "बुडवतां कशाला, तीं सोडून द्या." अशा तऱ्हेचा उपदेश करण्यांत आला. "तीं सोडून दिलीं म्हणजे एका मिनिटांत मरायचीं तीं हाल हाल होऊन उपाशीं मरणार. किंवा जगलीं वांचलीं तर चोरटीं मांजरें होऊन सर्वांच्या शिव्या व धोंडे खात आयुष्य कंठणार ! त्यापेक्षां बुडवलेलीं काय वाईट ! चटकन् प्राण जाईल." "कोणीतरी त्यांना पाळील." हा आणखी वर उपदेश आहेच. तेव्हां मींहि प्रकरण धसाला लावलें. "कोणी तरी नाहीं, तुम्हीं चार घरचीं चार माणसें आहां. पिलें तीनच आहेत. नेतां का ? न्या. मग बुडवायचें प्रयोजनच राहणार नाहीं." परंतु एकसुद्धां पिल्लूं नेण्यास कोणी तयार होईना. फुकटचा उपदेश करण्यास मात्र सगळीं एका पायावर तयार. माझ्या ओळखीच्या मंडळींपैकीं कोणालाहि तीं नको होतीं. मग सोडून दिल्यावर दुसरें तरी कोण त्यांना पाळणार होतें ? अर्थात् मीं तीं पिलें बुडवलीं हें सांगावयास नको. गडीहि त्यांना

बुडवण्यास तयार होईना. तेव्हां हें कटु काम मला माझ्याच हातानें करावें लागलें. त्यांत मला कांहीं आनंद झाला असें नाहीं. वाईटच वाटलें. रात्रीं जेवण गेलें नाहीं. पण हात कुजला म्हणजे तो तोडून टाकणें जसें प्राप्त होतें, तसेंच नको असलेल्या पिलांना शक्य तितक्या शीघ्र व अल्पवेदनादायक उपयांनीं मारून टाकणें अवश्य आहे. प्रत्येक पाळीव जनावराच्या मालकानें त्यांच्या पुढील पिढींतील नको असलेल्या पिलांची अशी व्यवस्था लावणें जरूर आहे. तेणेंकरून रस्त्यांत रोग होऊन भटकणारीं, दुसऱ्यांना उपद्रव देणारीं बिनवारशीं जनावरें नाहींशीं होतील. खरी माणुसकी त्यांतच आहे. खोट्या दयेनें प्रेरित होऊन नको असलेल्या पिलांना उपाशीं मारण्याकरितां सोडून देणें हें भ्याडपणाचें, क्रूरपणाचें आहे. विलायतेंत बिनवारशीं जनावरें कोठेंहि आढळणार नाहीं. बाळगलेल्या प्रत्येक प्राण्यासाठीं कर द्यावा लागतो व त्याची पावती म्हणून त्या सालचा आंकडा खोदलेला एक बिल्ला त्या प्राण्याच्या गळ्यांत अडकवायला मिळतो. प्रत्येक प्राण्याच्या–विशेषतः कुत्र्याच्या–गळ्यांत पट्टा असून त्यावर मालकाचें नांव लिहिलेलें असतें. त्यायोगें एखादे वेळीं कुत्रा कोठें चुकला तर त्याला त्याच्या मालकाच्या घरीं पोहोंचतें करतां येतें. नको असलेल्या जनावरांना ताबडतोब बुडवून अथवा गोळी घालून टकतात. प्राण्यांची आवड असणाऱ्या माणसांना सर्वच प्राणी आवडतात असें नाहीं. कोणाला कुत्रीं आवडतात, कोणाला घोडीं तर कोणाला गाढवें, कोणाला मुंगूस तर कोणाला साप, कोणाला माकडें तर कोणाला अस्वल, कोणाला मासे तर कोणाला पक्षी. मुंग्यांपासून तों हत्तीपर्यंत सर्व जनावरांचे शोकी लोक या जगांत आहेत. ज्यांना प्राण्यांची आवड नाहीं किंवा विशेष प्रकारच्या प्राण्याची आवड नाहीं, त्यांच्या मनांत मात्र त्या त्या प्राण्यांसंबंधीं अनेक गैरसमज असतात. उदाहरणार्थ, पक्षी बाळगणें हें क्रूरपणाचें आहे असें कित्येक दिवस मला

वाटत असें. पक्ष्यांची स्वतंत्रता हरण करून त्यांना पिंजऱ्यांत कोंडून ठेवणें हें निंद्य आहे अशी माझी खात्री होती. परंतु प्रेमानें पाळलेल्या पोपटाला पिंजरा उघडून दिला तरी तो घराबाहेर जात नाहीं हें मला अलीकडेच कळलें. त्याला कोंडतात तें केवळ मांजर खाईल या भीतीनें. परंतु 'पिंजरा' 'सोन्याचा पिंजरा' इत्यादि कविवचनें ऐकल्यानें माणसाची गैरसमजूत किती दृढ होते. ब्राझीलमधल्या माझ्या एका मित्राच्या घरीं एक पिढीजात पोपट आहे म्हणजे तो सुमारे दोनशें वर्षांचा आहे. या पोपटाचें माझ्या मित्राच्या आईवर फार प्रेम आहे. तो तिच्या खांद्यावर बसून तिच्या कानाच्या पाळीचे पापे घेतो, तिच्या तोंडांतला घास चोंचीनें काढतो. माझा मित्र लहानपणापासून शाळा, कॉलेज व नंतर नोकरीच्या कारणानें परदेशीं असे, मात्र जेव्हां तो घरीं जाई तेव्हां या पोपटाचा भडका उडे. एक दिवस तो याच्या कानाला कडकडून चावला. तेव्हांपासून मुलगा घरीं यायचा झाला कीं, पोपटाला कोंडून ठेवीत. आमच्या घरीं नित्य मांजरांचा लड-बडाट असल्यामुळें आम्हीं पक्षी कधींच पाळले नाहींत. मात्र मी विलायतेहून लखनौला आलें तेव्हां घरांत एकसुद्धां मांजर नव्हतें. लगेच मी मांजराचा तपास करूं लागलें. एका गड्यानें तीन आठवड्यांचें कुठलें तरी एक गांवढळ मांजराचें पोर माझ्या ओट्यांत आणून टाकलें. तें बाळगणें भाग आलें. धाकट्या बाईला जनावरें आवडतात असें पाहून मोलकरणीनें दोन पांढरे उंदीर आणून दिले. त्यांच्या शेंपटया कशा सोलल्यासारख्या दिसत. दुसऱ्या एका नोकरानें एक खारीचें पिल्लूं आणून दिलें. चवथ्यानें माकड आण-ण्याचा धाक घातला. अखेरीस नव्या मालकिणीला खूष करण्याच्या स्पर्धेमुळें घरांत लवकरच एक प्राण्यांचें संग्रहालय होईल, अशी भीति वाटून जास्त प्राणी न आणण्याविषयीं सर्वांना बजावलें. खार बाळगण्याचा माझा तो पहिला व शेवटचाच प्रसंग ! ती खार इतकी माणसाळली कीं कोठून तरी

पुटकन् खांद्यावर उडी मारून नाक, कान, तोंड चाटीत असे. थंडी वाजूं लागली म्हणजे अंबाड्याच्या आंत जाऊन बसे. "कुच् कुच्" अशी बडबडहि पुष्कळ करी. रात्रीं बिछान्यांत येऊन निजे. खांद्यावरून भिंतीवर सरकन् झेप घेई. मला ती खार फार आवडूं लागली होती. जेवायच्या वेळीं टेबलावर येई, मानेवरून, दंडावरून, पोटावरून गोड गोड गुदगुल्या करीत सुरसुर चाले. परंतु एक दिवस ती बाहेर गेली ती फिरून सांपडली नाहीं. बहुधा घारीनें किंवा कावळ्यानें तिला खाऊन टाकली असेल. त्यानंतर मीं कधीं खार बाळगली नाहीं. कारण माझें मांजराचें पिल्लू मोठें होऊन शिकार करूं लागलें होतें. शिवाय ती खार आपले नैसर्गिक विधि अंगाखांद्यावर, फार काय, अंबाडयांतमुद्धां करीत असे. तिचा तेवढाच एक गुण वाईट होता.

  

**मां**जराचें गांवढळ पिल्लूं मोठें होऊन चिंगी हें नामाभिधान पावलें होतें. तिच्या बाललीला काय वर्णाव्या ! कोणी वर्तमानपत्र वाचीत असलें म्हणजे तिनें मांडीवर उडी मारून वर्तमानपत्राखालून सळसळत छातीवर येऊन दोन्ही पंजानें एकदम दोन मुस्कटांत माराव्या व नाक चावावें. आप्पांची अशी खोडी काढणें तिला विशेष आवडे. कारण, नाकाबरोबर मिशांचीं अणकुचीदार टोकेंही चावायला मिळत. ही मांजरी अत्यंत बुद्धिमान् होती. "चिंगुड्या, पापा घे" म्हटलें कीं ही मांडीवर चढून गालओंठ चाटूं लागे. हिला शिवाशिवी खेळायला फार आवडे. "चल मी पकडतें तुला" असें म्हटलें कीं ही झाडावर चढून मिस्किलपणें खालीं माझ्याकडे पाही आणि "आतां तूं पकड मला" म्हटलें कीं लगेच खालीं उतरून जवळच्याच एकाद्या झुडपांत लपून बसे व चालतांना पुटकन बाहेर येऊन पायाला

विळखा घाली. हिला लोंकर खायाला अतिशय आवडे. लखनौला हिंवाळ्यांत थंडी फार आणि गरम कपडे बाहेर काढले कीं चिंगाबाईचें फावे. चिंगीनें चगदण पाडलें नाहीं असें एकही काबळें ( ब्लँकेट ) आमचेकडे नाहीं. गरम पुलओव्हर, ड्रेसिंग गाऊन जें सांपडेल तें या बाईसाहेब चघळीत बसायच्या.

  

**गो**कुळांत खोड्या करून कृष्णानेंसुद्धां उच्छाद आणला नसेल इतका हिनें आणला. तिच्या या गुणामुळें तिला टाकून देण्याची भाषाही घरांत, विशेषतः आजीकडून, वारंवार ऐकूं येई. एकदां चिंगीनें खाल्लेलें एक कांबळें आजी चरफडत चरफडत रफू करीत बसली होती. माझी नजर सहज खालीं गेली तों चिंगाबाई खाली दुसऱ्या टोंकाला गुर्र करीत तें कांबळें खात होत्या. हिनें घरांत घाण करूं नये म्हणून हिच्या लहानपणापासून मोरींत, माती घालून एक घमेलें ठेवलें होतें. तेथें जायचें असलें म्हणजे ही हांक मारून मोरीचें दार उघडायला सांगे. इतकेंच काय पण चांगली तीन मुलांची आई झाल्यावरसुद्धां ही जर बागेंत असली आणि परशुरामपंतांचें बोलावणें आलें तर ही घरांत येण्याकरितां बाहेरचें दार उघडायला सांगे व सरळ मोरीकडे जाई. इतर मांजराप्रमाचें हिनें नैसर्गिक विधीकरितां अंगणाचा उपयोग कधींच केला नाहीं. ह्या मांजरीवर माझें जितकें प्रेम होतें तितकें कोणत्याही मांजरावर कधीं बसलें नव्हतें व बसणार नाहीं. रात्रीं ही नेहमीं माझ्या हंतरुणांत निजे. एकदां मी दीड महिना आजारी होतें हिनें माझें हंतरुण कधीं सोडलें नाहीं. चिंगीचे सर्व प्रताप लिहीन म्हटलें तर एक वेगळाच लेख होईल. इस्पितळांत बाळंत होऊन जेव्हां मी घरीं आलें तेव्हां चिंगीनें अर्धा तासभर माझें तोंड चाटलें, पण जेव्हां का माझ्या तान्ह्या मुलीचें नवीन अस्तित्व तिच्या नजरेस आलें तेव्हां तिनें सईकडे असें

कांहीं रागानें व मत्सरानें पाहिलें कीं माझ्या उरांत धडकीच भरली. ती जातीची इतकी लाघवी होती तरी सईचा तिनें एकदांसुद्धां पापा घेतला नाहीं. उलट सई दृष्टीस पडतांच तिची मुद्रा अशी कांहीं उग्र व संतप्त होई कीं मी सईजवळ सदोदित एक माणूस पहाऱ्याला ठेवूं लागलें. चिंगीच्या मत्सराच्या भीतीनें आम्ही सुट्टींत चिंगीला लखनौलाच ठेवून गेलों.

  

सुट्टींत आमच्या घरीं आप्पांचे चिटणीस राहणार होते. आणि त्यांचाही चिंगीवर फार जीव होता. परंतु आम्हीं जातांच तिनें घर सोडलें. सुट्टीहून परत आल्यावर " चिंगे चिंगे ये " असा आक्रोश करीत व " चिंगीला पाहिलीत का " म्हणून लोकांना विचारीत मी विश्वविद्यालयाच्या सर्व आवारभर भटकत होतें. सर्वांनीं मला वेड्यांत काढली असेल, काढीनात. प्रेमानें माणूस वेडें होतें. राम नव्हता का " हे सीते हे सीते " करीत वृक्ष-पर्वताजवळ तिची विचारपूस करीत ! चिंगी सांपडून देणाराला पांच रुप-यांचें बक्षीसही लावलें. अखेरीस मी खेळायला जात असें त्या क्लबांत ती असल्याचा टेलिफोन रात्रीं ११ ला आला. लगेच मी शोफराला उठवून क्लबांत गेलें. हांक मारतांच लगेच ती मजजवळ आली. मीं तिला उचलली, आम्ही एकमेकींचे पुष्कळ पापे घेतले आणि मोटारींतून आम्ही दोघी घरीं आलों. तिला दूध घातलें, तिनें सगळीकडे हिंडून सर्व घराची पहाणी केली व मजजवळ येऊन सारखी ' म्यांव म्यांव ' करून दरवाज्याजवळ नाचूं लागली. हिला कांहीं तरी हवें आहे हें मला समजलें. मीं उठून दरवाजा उघडला तेव्हां ती बाहेर गेली व मला बोलावूं लागली. मला संशय आला. तिनें पिल्लें घातलीं होतीं. फिरून मी तिला घेऊन मोटारींतून क्लबांत गेलें. ती सारखी कांहीं तरी सांगे पण पिल्लें कांहीं दाखवीना. मागून समजलें

कीं तिनें ज्या कोठींत पिले घातलीं होतीं तीं रात्रीं बंद केली होती. मी घरीं जाऊं लागलें कीं ती मागोमाग येई. अखेरीस मी चालतच घरीं जायचें ठरवलें. ती कुत्र्याप्रमाणें अर्धा मैल माझ्या मागोमाग आली, पण पुढें पुलावर मुलें मोठमोठ्यांदा गाणें म्हणत होतीं त्यांना बिचकून पळून गेली. मी तशीच घरीं आलें व पिलें सांपडून देणाराला आणखी पांच रुपयांचें बक्षीस लावलें.

  

दुसरे दिवशीं पिलांसहवर्तमान चिंगाबाईनीं गृहप्रवेश केला. पिलें झाल्यापासून मात्र चिंगीनें सईचा द्वेष केला नाहीं. नंतर कांहीं महिन्यांनीं मी विलायतला गेलें. दुसऱ्याच दिवशीं चिंगीनें गृहत्याग केला. अजूनपर्यंत ती अज्ञातवासांतच आहे. इतकें असून बहुजनसमाज म्हणतो कीं मांजरांना माणसांचें प्रेम नसतें, जागेचें असतें. चिंगीच काय पण जेव्हां जेव्हां आम्हीं घर बदललें आहे तेव्हां तेव्हां आमच्या त्या त्या वेळच्या मांजरांनीं मोठ्या खुषीनें आमचेबरोबर आपलेंही बिऱ्हाड बदललें आहे. माझी हल्लींची मांजरी लोटी आणि तिचा भाऊ चंबू या दोघांना आम्हीं मुलांप्रमाणें आमच्या डब्यांतून लखनौहून पुण्याला आणलीं. त्या वेळीं पुण्यास 'खिचडी' नांवाची आमची एक मांजरी होतीच. लोटी आणि खिचडी पहिल्या दिवसापासून एकमेकींना पाण्यांत पहातात. आतां अडीच वर्षें होऊन गेलीं पण त्या एकमेकींशीं एकसुद्धां शब्द बोलल्या असतील तर शपथ. सवती सवतीसुद्धां बोलत्या पण या मांजऱ्या इतक्या स्वाभिमानी आहेत कीं एकीला बशींत दूध घातलें तर दुसरी तिकडे बघायची सुद्धां नाहीं. तिला वेगळ्या बशींत दूध घालावें लागतें. प्रथम कांहीं दिवस या पुष्कळ भांडल्या परंतु आतां त्या एकमेकींच्या वाटेस न जातां "आपलें काम बरें आपण बरें" अशा वृत्तीनें राहतात. एकीला पोरें झालीं तर मात्र दुसरीही त्यांना पाजते. नाहींतर आपण

माणसें ! कोणाशीं वाकडें आलें तर त्याच्या नातवंडा–पतवंडावरही सूड उगवायला तयार. परंतु संसारांतील या कलहाला कंटाळून चंबूमहाराजानीं मात्र संन्यास घेतला. ते आमच्या घरासमोर वैदिकाश्रमांत वेद पढत असतात. या मांजऱ्यांचीं बाळंतपणें म्हणजे एक प्रकरणच असतें. त्यावेळीं त्या आम्हाला बोलावून जवळ बसायला सांगतात आणि पोटांतून इतक्या कांहीं प्रेमानें व गोडपणें लाडिक लाडिक आवाज काढून बोलतात त्या पिल्लें मोठीं होऊन मार्गी लागेपर्यंत. मोतीवाल्या थत्त्यांच्या येथेंही कुत्रीं–मांजरें पुष्कळ आहेत, तेथें मायलेक दोघी लेकुरवाळ्या असल्या म्हणजे आजी आपल्या पिल्लांना व नातवंडानाही पाजते आणि आई आधुनिक आयांप्रमाणें भटकायला जाते. एकदां आजीचे दिवस भरले होते, पोट दुखूं लागलें तेव्हां तिनें घरांतील मंडळींना ' म्यांव म्यांव ' करून बोलावलें पण त्यांना कांहीं समजलें नाहीं, मग तिनें आपल्या मोठ्या मुलीला बोलावलें पण तीही येईना. मानगूट धरून फरफटीत आणून बाळंतपणाला जागा शोधली होती तेथें बसवलें पण ती उठून गेली. अखेरीस तिनें चंपी कुत्रीचा पट्टा धरून तिला तेथें आणलें. चंपीला मात्र या माऊ आजीच्या मनांतला हेतु कळला व तिची सुटका होईपर्यंत चंपीनें तिला सोबत केली. वेगवेगळ्या मांजरांच्या आवडीनावडी व स्वभाव इतके भिन्न असतात कीं, मांजरवेड्या लोकांखेरीज तें कोणाला खरेंही वाटणार नाहीं.

  

**सौ.** सरोजिनी नायडूंच्या येथें ' झमूझम् ' नांवाचा राखी रंगाचा एक सुंदर केसाळ बोका आहे. हा अस्सल मोंगल आहे. याला धोतर नेसलेलीं माणसें आवडत नाहींत. परवांच त्यांची मुलगी पद्मजा सांगत होती कीं, काँग्रेसवाली धोतर नेसलेली मंडळी आईकडे आली कीं, झमूझम् तेथून पळ

काढतो. पद्मजावर याचें विशेष प्रेम आहे. ही एकदां गोव्याहून परत आली तेव्हां याला इतका कांहीं आनंद झाला कीं त्यानें तिला चावून व ओरबडून बेजार केलें.

  

**मा**झी चिंगीही फार प्रेमांत आली की चाटतां चाटतां काडकन गालाचा नाहींतर नाकाचा चावा घेई. मांजराच्या आवडी फार विचित्र असतात. खिचडीला शेवग्याच्या शेंगा, बटाट्याच्या साली फार आवडतात, तर गंगीला सुपारी, पोपया आणि तोंडलीं फार आवडतात. माझा जांवई वाघ्या हा मुळींच खादाड नाहीं. परंतु डाळें घरांत आणलें कीं याची धांदल उडते. खिचडीला डोकें खालीं व ढुंगण वर अशा अवघड पवित्र्यांत बसायला हवें असतें तर हिच्या आईच्या मानेवर बसे. लोटीला गाणें आवडतें; गंगीलाही आवडत असे. गंगीचें आप्पांवर फार प्रेम होतें. आप्पा बंगलोरला सुमारे वर्षभर होते. ते परत आल्यावर गंगीला अतिशय आनंद झाला. ती सकाळीं सात वाजलें कीं नेमकी आप्पांना उठवावयाला जायची. ही अठरा वर्षांची होऊन मेली. मांजरांना आवाज बरोबर ओळखतो. आप्पा घरीं येत तेव्हां बाहेरून “ दार ” म्हणून ओरडत. आप्पांचा शब्द कानीं येतांच रंग्या असेल तेथून धांवत येऊन दाराच्या कडीकडे पहात बसे. काढतां येती तर त्यानें ती कडी काढली असती. प्रेमानें वाढवलेलीं मांजरे अतिशय लाघवी असतात, ती चोरून खात नाहींत.

  

**फार** काय ‘ खा एकदांची ’ म्हणून भस्कन् त्यांना पुष्कळ खायला घातलें तर ती रुसून बसतात, पदार्थाला तोंडही लावीत नाहींत, पण तेंच अन्न, जवळ बसून गोड बोलून एक एक घास घालून भरवलें तर सारें खाऊन

टाकतात. मांजरांना कृतघ्न, अप्पलपोटी, निर्बुद्ध या विशेषणांनीं पुष्कळ लोक संबोधतात. तें कां तर भाकरीच्या तुकड्याकरतां तीं माणसांचीं गुलाम होत नाहींत म्हणून. मांजराला भाकरीची पर्वा नसते. माणसाची असते. जें माणूस त्याला आवडतें त्यानें त्याला कधीं एक घासभरसुद्धां खाऊं घातलें नाहीं तरी मांजर त्यावर अखंड प्रेम करतें व त्याच्याबरोबर कोठेंही जायला तयार असतें. माझा जांवई वाघ्या याला मी अगदीं पुस्तकाप्रमाणें माझ्या हातांत घेऊन घरीं आणतें. तो येथें चैनींत राहतो. घरची आठवण सुद्धां काढीत नाहीं. मात्र परवां मला पांच दिवसांनीं गांवाला जावें लागलें तेव्हां लगेच स्वारी परत आपल्या घरीं गेली. मांजर अन्नाचें मिंधें नसतें. तें अत्यंत स्वभिमानी, संतुष्ट व स्वतंत्र वृत्तीचें, आणि दुसऱ्याच्या कारभारांत कधीं तोंड न घालणारे असतें. इतर जनावरांप्रमाणें त्याला कांहीं शिकवतां येत नाहीं म्हणून त्याच्यावर निर्बुद्धपणाचाही आरोप करण्यांत येतो. तें शिकत नाहीं याचें कारण तें फटक्यांच्या भीतीची किंवा खाऊच्या लाचेची पर्वा करीत नाहीं. मनुष्यप्राण्याच्या कसरतीच्या हौसेची तें फिकीर करीत नाहीं. परंतु प्रेमानें तें पुष्कळ गोष्टी शिकतें. माझी लोटी माझ्या तोंडांतून घांस घेते. मांडीवर आडवी होऊन मुलाप्रमाणें चमच्यानें दूध पाजून घेतें.

  

**मां**जर फार बुद्धिमान् असतें. एखाद्या अडचणीच्या जागीं खाण्याचा कांहीं पदार्थ ठेवला तर मांजर जितक्या लवकर तो पटकावील तितक्या लवकर कुत्र्यालाही तें साधणार नाहीं. माझ्या मामाची मांजरी शकी ( माझ्यावरूनच तिचें नांव ठेवलें आहे. ) पेल्यांतील दूध ऊन असलें तर त्यांत् पंजा बुडवून तो चाटते व अशा युक्तीनें सर्व दूध चट्ट करतें. मांजर घरांत असलें कीं उंदराचें भय नाहीं. इतकेंच नाहीं तर विंचूकाटयाचेंहि भय

नाहीं. मांजर सापालासुद्धां मारतें. एका नागाची व एका मांजराची लढाई मीं पाहिलेली आहे. नागानें जरा वळवळ केली किंवा फणा वर उचलली कीं मांजर त्यावर पंजा मारी. नाग अगदीं रक्तबंबाळ झाला होता. हें द्वंद्व दीड तास चाललें होतें. अखेरीस मांजराची सरशी होऊन नागराज गतप्राण झाले. मांजराचे कट्टे द्वेष्टेही मांजराच्या निर्मलपणाचे गोडवे गातील. मांजराइतका सुंदर प्राणी मला वाटतें साऱ्या दुनियेंत नाहीं. त्याचा प्रत्येक हावभाव गोंडस दिसतो. त्याचें बसणें, उठणें, वेटोळें करून निजणें, अंग चाटणें, पंजानें डोकें चाटणें, शेंपटी वर करून चालणें, लाडांत डोकें घासणें, सर्वच किती मनोहर दिसतें. मांजराच्या पिलाचा खेळ म्हणजे तर सौंदर्याची परमावधीच वाटते. यावरून लंडनमध्यें घडलेली एक हकीकत आठवते. एकदा रविवारीं शेवटच्या खेळानंतर मी एकटीच घरीं येत होतें. रात्रीं बाराचा सुमार असेल. वाटेंत एक चार पांच महिन्यांचें मांजराचें पिल्लूं एका घराच्या कुंपणाच्या भिंतीवर चढून बसलेलें दिसलें. मीं त्याला जवळ घेतलें, त्याच्याशीं बोललें, एकदोन मुके घेतले आणि फिरून त्याला भिंतीवर ठेवून चालूं लागलें. कांहीं वेळानें माझ्यामागें पाचोळ्यांतून कांहीं तरी सळसळल्याची चाहूल लागली. पाहिलें तर हे पिलाजीराव माझ्यामागून येत होते. मी जरा चपापलें. याला घरीं न्यावें तरी पंचाईत. कारण रविवारीं मोलकरणीला सुट्टी असल्यामुळें जेवणाचीं उष्टीं खरकटीं व उरलेलें अन्न सगळें टेबलावर असणार, तें हें मांजर सांडील, लवंडील, पाडील, फोडील ही भीति. शिवाय विलायतेंत कांहीं भटकीं मांजरें नसतात. उगीच कोणाचें मांजर कसें घरीं न्यायचें ? चोरीचा आळ आला तर ? मीं जरा थांबून प्रेमानें त्याला "बाळा जाई परतोनि" असा उपदेश केला पण तें कांहीं ऐकेना, तेव्हां थोड्याशा गंभीर स्वरांत मीं त्याला म्हटलें "सोन्या, जा आतां घरीं, ह्या भलत्या वेळीं कशी मी तुला घरीं नेऊं ? माझे वडील

काय म्हणतील. जा, माझ्या मागें येऊं नको अन् मला त्रास देऊं नको, जा." असें बडबडत मधून मधून मागें वळून पहात मी पुढें चाललें होतें. कोपऱ्या-वर वळतें तों माझे शब्द ऐकून एक पोलीसचा शिपायी अस्तन्या वर करून विचारूं लागला "बाई काय भानगड आहे?" माझ्या भाषणावरून एखाद्या बाईला रात्रीं त्रास देणारा कोणी तरी लफंग्या असेल असें वाटून शिपाई-बोवा आपलें कर्तव्य बजावीत मदतीला धावून आले होते. मी माझें हंसूं दाबीत "ती पहा भानगड" असें म्हणून त्या पिलाकडे बोट दाखविलें त्यावेळीं त्या धिप्पाड पोलिस शिपायाचा चेहरा चित्र काढण्यासारखा झाला होता. आश्चर्य, निराशा, उपहास, हंसूं असे किती तरी भाव त्याच्या चर्येवर उतरले होते. शिपायाची फजिती झाली असली तरी आमच्या मार्जार मित्रवर्यांनीं मात्र त्या काळे डगलेवाल्याला भिऊन पोबारा केला होता, खरा. 'मांजर' हा विषय निघाला कीं मला रहावतच नाहीं. परंतु मांजरें आधींच थोड्या लोकांना आवडतात. त्यांचें चऱ्हाट अधिक वळीत बसलें तर कांहीं मंडळी त्यांतलीही कमी होतील अशी भीति वाटते, तेव्हां येथेंच आटोपतें घ्यावें हें बरें.

## हरवलेली छत्री

५

''माझी छत्री कुणीं नेली ?' आप्पा गरजले. दुपारचे तीनसुद्धां वाजले नव्हते. आत्तां यांचें काय नडलें होतें छत्रीवांचून. तीहींच्या आंत नोकरांपैकीं कोणीं गडबड केली तर अशी फैलावर घेतें मी एकेकाला. पण आप्पांची काय तशी हजिरी घेतां येते ? बाकी इतर लोकांना वाटतें कीं मी आप्पांना सासुरवास करतें म्हणून. स्पष्ट बोलणें हा काय सासुरवास झाला ? हे लोक भितात त्यांच्या मिशांना. मला हो कसली त्या मिशांची भीति ? चांगल्या उपटल्या आहेत लहानपणीं दोन्ही हातांनीं.

"कोणीं नेली माझी छत्री ?" खालीं गजर चाललाच होता. मी वर नुसती ह्या कुशीची त्या कुशीला वळलें. पण आजी बिचारी जांवईबोवांच्या छत्रीच्या शोधार्थ खुडबूड करूं लागली. "कुठें ठेवली होती ती छत्री ?" असें आजीनें विचारतांच जांवईबोवांचा सूर वरच चढला. "तें माहीत

असतं तर कशाला हुडकीत बसलों असतों गाढवासारखा!" मला ओरडायची संवय आहे असा आप्पा आपले नेहमीं माझ्यावर आरोप करीत असतात. "तुम्ही माझ्या दसपट ओरडतां" म्हटलें तर ते कबूल करीत नाहींत. बरे, माझी बाजू उचलून धरायला कोणी धजावत नाहीं. भीति वाटते ना मिशांची!

"पांडू माझी छत्री पाहिलीस का रे कोठें?" "नाय बा सकालीं मी झाडलां नाय." "राम, तूं घेतलीस माझी छत्री? नाहीं? मग जानकीला विचार पाहूं." सगळें घर ती छत्री शोधायला लागलें. मांजऱ्यासुद्धां कावऱ्या-बावऱ्या होऊन कान मागेंपुढें करीत, नाकपुड्या हलवीत, अडीअडचणींतून नाक खुपसून छत्री शोधायला लागल्या. मग त्यांना छत्री म्हणजे एक मोठा थोरला उंदीर वाटला कीं काय न कळे. तेवढ्यांत एकीच्या शेपटीवर आप्पांचा पाय पडला. ती कें्काटली. आप्पा रंगांतच होते. "चायला सारखीं अडमडत असतात पायांत पायांत." इतक्यांत आमचें कन्यारत्न जानकीबरोबर धांवतच शाळेंतून घरीं आलें. मांजरीचें केंकाटणें फाटकांतच तिच्या कानीं आलें होतें. "काय झालं आजोबा? लोटीला काय झालं? तूं मारलंस तिला?" पण तिच्या प्रश्नावलीकडे आजोबांचें लक्ष कुठें होतें. ते जानकीलाच विचारतात,

"जानकी, तूं सईला आणायला माझी छत्री घेऊन गेली होतीस?"

"न्हाई, मीं माझी छत्री नेली होती. ही बगा."

"मग माझी छत्री गेली कुठें!"

"सकाळीं मीं झाडलं तवा होती."

आमच्या कन्यारत्नाची जिज्ञासा जागृत झाली.

"आजोबा कुणाची छत्री?"

"माझी."

"कुठें होती?"

" जानकी म्हणते सकाळीं इथें होती. "

" कशी होती "

" मुठीला एक गोंडा होता. "

" मला हवा गोंडा. ऊं...ऊं...ऊं " केवढा अनर्थ ओढवला आहे ! एक सबंध छत्री हरवली आणि ही पोरटी आपली गोंडयाचें टुमणें घेऊन रडत बसते. काय म्हणावं हिला.

" झाली काय मग छत्री ? मागल्या महिन्यांतच विकत आणली होती. कश्शाला घेत असतात दुसऱ्याच्या वस्तू. आणि परत जागेवर म्हणून कध्धीं ठेवायच्या नाहींत...... " ती छत्री सांपडेपर्यंत आमच्या तीर्थरूपांचा आकांत चालू रहाणार हें पाहून आम्हीं त्या बाबतींत लक्ष घालावयाचें ठरवलें. जिन्यावर माझीं पावलें वाजतांच आप्पा विचारतात, " शकू, तूं घेतली असशील माझी छत्री. "

" मी कधींच कोणाची छत्री घेत नसते. तुम्हींच विसरलां असाल कुठेंतरी. "

" मी आज बाहेर तरी गेलों का ? उग्गीच काय ? "

" मग काल रात्रीं पत्त्याच्या अड्ड्यावर राहिली असेल. "

मध्येंच जानकीनें तोंड घातलें. " न्हाई. मी सकाळीं झाडली तवां होती."

" मग मात्र चमत्कार आहे. कायरे तुम्ही कोणी घेतली होतीत ? "

छत्रीला बोट लावलें नाहीं म्हणून सर्वजण शपथा घेऊं लागले. शिवाय सगळे नोकर जुने आणि प्रामाणिक. मग घरांतून गेली म्हणायची छत्री. जिन्नस घरांतून जातो कसा ? " कायरे तुम्हीं कोणी पुढलं दार उघडं टाकलं होतं का ? "

" बाई आमी न्हाई कधीं पुढलं दार उघडं टाकीत. तुमी बाहीर बागेंत फिरतां तवा बरीक असतं उघडं. " झालें. माझ्याच गळ्याशीं आलें. चोर तरी

काय धीट हो ! त्या दिवशीं माझ्या चुलत्यांची फाटकापासली सायकल नेली. परवां शेजारच्या वासूच्या सायकलचा दिवा अगदीं अंगणांतून पळवला. आणि आत्तां सरळ घरांतून छत्री लांबवली. धैर्याची तर कमालच आहे म्हणायची.

" पण कायहो आप्पा, आज तुमच्याकडं कोण कोण आलं होतं ? "

" महाजनि आले होते. "

त्यावर जानकी म्हणते, " त्यानी न्हाई नेली. मी पगितलं त्यांना जातांना. "

" आणखी कोण आले होते ? "

" आणखी नाहीं कोणी आलं. "

" काय ? सबंध सकाळभर एकट्या महाजनीखेरीज दुसरं कोणीच आलं नाहीं तुमच्याकडे ! आश्चर्यच आहे मोठं ! त्या दारावरच्या घंटेला किती महिन्यांत अशी विश्रांति मिळाली नसेल ! " मीं जरा उपहासानें म्हटलें. पण आप्पा काय कमी आहेत ? किती झाले तरी ते माझेच वडील. ते लगेच म्हणाले, " तुझ्याकडेच आले होते बापूसाहेब. " हो खरेंच. आज सकाळींच बापूसाहेबांच्या मोटारींतून आम्ही चार मंडळी ग्रामसुधारणा करायला गेलों होतों खरीं. कोणी शेतकऱ्यांना खतपाण्याची माहिती देतात, कोणी विहिरी खणतात, कोणी रस्ते करतात, कोणी शेंबड्या पोरांना आंघोळी घालतात, कोणी शाळा काढतात, कोणी औषधं देतात, आमचा आपला तिसराच पंथ. आम्ही संततिनियमनाची माहिती देतों. देतों कसल्या देऊं पहातों. आधीं कोणी माझें म्हणणें ऐकून घ्यायलाच तयार नसतें. त्यांतून चोरून मारून मागील दारीं हळूच कोणी तयार झालें तर म्हणतात, " बाई हें नग. नरड्यांवाटं घ्यायचं औषाध द्या. " मीहि पण त्यांच्या भाषेंत उत्तर देतें. " देईन. पर तुमी नरड्यावाटं प्वार काढून दावा तवा नरड्यावाटं घ्यायचं

औषाध देईन. " एकदां तर मला एक अशी शिष्यीण भेटली! म्हणते, "बाई गुदस्तां तुमचा मंत्र ऐकला तर या बारीला मला जुळीं प्वारं झालीं. " आपण केली असेल चूक आणि त्याचें खापर माझ्या माथीं! आणि जुळीं झालीं हा काय माझा दोष? बाकी तीनचार बायकांनीं मात्र नाहीं म्हणायला मला चांगलें यश दिलें.

नाहींतरी खेडयांतल्या बायकांशीं वागणें मोठें कठीण. प्रथम मी आपली खेड्यांत जायचे म्हणून माझ्याकडून चांगली तयारी केली. तिथल्या बायकांना परकें वाटूं नये म्हणून चांगलें टोपपदरीं इरकली लुगडें नेसलें. सरळ भांग काढून चप्प अंबाडा घातला. मोठें कुंकू लावलें. पायांत कोंकणी वहाणा घातल्या. मला वाटलें पुरें झालें. पण गळा भुंडा होता आणि कपाळाला कुंकू होतें हा विरोधाभास आमच्या सुधारकी डोळ्यांना दिसला नाहीं. बरें इतकेंच करून थांबलें असतें तर एकादी 'लगीन न झालेली शिकलेली बाई' वाटलें असतें. पण एक दिवस माझ्या सईला दाखवायला घेऊन जायची दुर्बुद्धि झाली. हो. मोठा अभिमान वाटतो ना मला तिचा! झालें. बायका आपापसांत कुजबुजूं लागल्या "नवरा हाय म्हणावं तर गल्यांत काई बी न्हाई, न्हाई म्हणावं तर कुकू लाविती. लगीन झालं न्हाई म्हणावं तर प्वारीला घेऊन येती. कसली आवा हाय काय जनु." ही एवढी सगळी भानगड चुकवायला मग आईचें मंगळसूत्र धुंडून काढलें आणि ग्रामसुधारणेच्या वेषांत त्या मंगळसूत्राची भर घातली. एवढें सगळें कशासाठीं तर दुसऱ्याची संतति मर्यादेंत ठेवण्यासाठीं. जाईनात. होईनात का खंडीभर पोरें. मला कशाला फुकटची उठाठेव? बाकी मीं जेव्हां हें काम हातीं घेतलें तेव्हां मला वाटलें होतें कीं लोक म्हणतील, 'आपल्याला पोरं व्हायचा मार्ग खुंटला तेव्हां आतां दुसऱ्यांना बंद करायला सांगते.' पण एकाहि सुशिक्षितानें अशी टीका केली नाहीं. माझ्या काकूच्या म्हाताऱ्या आत्याबाईनें मात्र बरोबर टोला मारला. "नांदत नाहींस

नवऱ्याजवळ आणि आपल्याला पोरं होत नाहींत तेव्हां आतां लांडग्या कोल्ह्याप्रमाणें दुसऱ्यांना शेपटया तोडा म्हणून उपदेश करतेस. "

असो. छत्रीची कहाणी बाजूलाच राहिली. बापूसाहेब सकाळीं घरीं आले होते खरे. त्यांनीं तर चुकून आप्पांची छत्री नेली नसेल ना ? त्यांच्या मोटारींत दोन छत्र्या पाहिल्याचें मला अंधुक अंधुक आठवूं लागलें. ठरलें. तपास करायचा. काढली बाहेर सायकल. घातला पावसाचा कोट. चढवली टोपी. इतक्यांत सईबाईनीं हटकलें, " आई कुठें चाललीस ? " " मण्णांत. " माझा कांहीं शकुनापशकुनावर विश्वास नाहीं पण नसतें विचारलें टवळीनें तर काय बिघडलें असतें ? इतकेंहि करून कुठें थांबली लंका. " मी येणार " ची टुरटुर आहेच. " अग सायकलवर कशी येशील तूं ? " शेवटीं तिला खेळ आणावयाचें वचन दिलें तेव्हां एकदाची सुटका झाली. त्याकरतां पिशवीचें लोढणें बरोबर घ्यावें लागलें. लगेच सायकलवर स्वार होऊन आम्ही जोरानें पाय मारीत बापूसाहेबांच्या घरीं येऊन ठेपलों. सायकल बाहेर ठेवली आणि एकएक पायरी वगळून ताडताड जीना चढून वर पोहोंचलों. नमस्कार बिमस्काराच्या भानगडींत बिलकूल न पडतां विचारलें,

" बापूसाहेब, आज सकाळीं चुकून तुम्ही आप्पांची छत्री आणलीत काय ? "

"अं ? मी ? आप्पांची छत्री ? कशाला ?" बापूसाहेब माझ्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले. तेव्हां खालीं बसून त्यांना सर्व प्रकरण समजावून सांगितलें. हो. जरी गेले दोन तीन तास आमचें घर छत्रीच्या शोधार्थ खालीं वर झालें असलें तरी बापूसाहेबांना कसा एकदम उलगडा होणार ? सर्व हकीकत ऐकून घेतल्यावर त्यांनीं आपल्या शोफरला बोलावलें.

" काय रे सकाळीं माझ्याजवळ छत्री होती का ? "

" होय साहेब. "

" मग ती आहे का ? "

" होय आहे. "

" माझीच आहे ती हे ? "

" होय आपलीच आहे. "

त्याबरोबर मीं प्रश्न केला,

" पण मोटारींत दोन छत्र्या होत्या. ती दुसरी कोणाची ? "

" ती त्या नर्सबाईची असेल. "

" नर्सबाईची छत्री पुढें त्यांच्याचजवळ होती. मागें दोन होत्या. तूंच नाहीं का मला ती उघडून दिलीस ? "

" ती काकासाहेबांची होती. मीं मघाच पोंचवली त्यांच्याकडे. "

" काकासाहेब तर पावसाचा कोट टोपी घालून आले होते. शिवाय काठी होती त्यांच्याजवळ. "

" हो. बरोबर आहे तुमचं म्हणणं, शकूताई. काठी आणि छत्री दोन्ही कांहीं कोणी बरोबर घेत नाहीं. "

बापूसाहेबांनाहि माझ्या अवलोकनशक्तीचें कौतुक वाटूं लागलें होतें. इतक्यांत शंका येऊन ते फिरून विचारतात,

" पण तुमची छत्री मोटारींत आली कशी ? तुम्हीं आणली होतीत ? "

" मीं नव्हती आणली. " डोकें खाजवीत मी म्हणालें.

" हा म्हणतो माझी छत्री मीं नेली होती. मग तुमची छत्री मोटारींत कुठून आली ? "

" मी सांगतें बापूसाहेब. तुम्ही आमच्या घरीं उतरलां तेव्हां आपली छत्री गाडींतच ठेवली असेल आणि जातांना चुकून आमची उचलली असेल. माफ करा हं, पण छत्रीची तुम्हांला संवय आहे जरा. " माझें डोकें आतां चांगलेंच चालूं लागलें होतें.

" तुम्ही म्हणतां तशी मला छत्रीची संवय आहे हें मात्र अगदीं कबूल. "

" आणि हें खरं असेल तर आमची छत्री आतां काकासाहेबांकडं असली पाहिजे. हो कीं नाहीं ? " वा ! माझा कयास जर खरा ठरला तर माझ्या अकलेची तारीफ करावी तेवढी थोडीच.

" बरं मग मी आतां काकासाहेबांकडे जाऊन पहातें. " मी उठूं लागतांच बापूसाहेबांनीं चहा वगैरे घेण्याचा आग्रह केला. पण छे ! थांबण्याचा मला मोहसुद्धां झाला नाहीं. त्या छत्रीच्या शोधाची धुंदीच जणुं माझ्यावर चढली होती. फरारी झालेल्या खुनी माणसाचा तलास लावणाऱ्या उत्साही पोलिसाला अशीच धुंदी चढत असेल का ? खालीं येऊन सायकल हातांत घेतली आणि हातांतली पिशवी दिव्याच्या खुंटीला अडकवली व टोपी शोधूं लागलें. टोपी नाहीं ! वर राहिली असेल असें वाटून तेथेंहि चटकन् पाहून आलें. तेथेंही नाहीं ! लांबविली कोणीतरी ! रस्त्यावरचीं एकदोन पोरें मिस्किलपणें माझ्याकडे पहात होती. त्यांचेंच बहुधा हें काम असावें. कारण मी आलें तेव्हां " बघ टोपी बघ " " आवाच्या डोईवर टोपी " अशी कुजबूज माझ्या कानीं आली होतीं. मी कधीं असल्या चेष्टांकडे लक्षच देत नाहीं. आपल्या बुद्धीला पटेल तें आपण करायचें. रूढी, टीका यांची काडीइतकी पर्वा करायची नाहीं हें आपलें तत्त्व. पण टोपी गेली कीं ! परवांच हुद्दाम कोटाच्या रंगाची अशी शोधून मामानें मुंबईहून पाठविली होती. आतां त्या टोपीच्या शोधाला जायचें कीं छत्रीचा शोध चालूं ठेवायचा ? अर्थात् हातीं घेतलेलें काम आधीं करायचें—असें ठरवून मारली टांग नी थडकलें काकासाहेबांच्या फाटकापाशीं. दोन्हीं फाटकें लावलेलीं. सदा लावून ठेवायचीं तर करायचीं कशाला तीं एवढीं मोठीं फाटकें ? सायकल फाटकाशींच ठेवली आणि आंत गेलें. काकासाहेब चारपांच मंडळीबरोबर गप्पा मारीत चहा घेत होते. आमच्याहि हातांत एक पेला पडला. पाहिलें ? मघांशीं बापूसाहेबांकडे चहा नको म्हटलें

तर इथं दारांत पाऊल ठेवतांक्षणीं चहा! निष्काम बुद्धीनें कर्म करणाऱ्याला भगवान असेंच फळ देतात!

काकासाहेबांना थोडी हकीकत सांगून "आज सकाळीं तुम्हीं बरोबर छत्री नेली होती का?" असें विचारले. त्यांनीं साफ नाहीं म्हटलें. मग झाले. आमचा तर्क खरा ठरला. त्यांची म्हणून पोचवलेली छत्री आमचीच असली पाहिजे. सिद्धच झालें मुळीं. याला म्हणतात गणिती डोकें. आणि लोक मला घालून पाडून विचारीत असतात कीं "तुम्ही गणिताच्या इतक्या"— म्हणजे दोनच—"परीक्षा दिल्यात त्याचं पुढें काय चीज केलंत?" जाऊं दे.

आतां ती छत्री घेऊन कधीं एकदाची घर गांठतें असें मला झाले. रोज तासन् तास घुटक्या मारीत चहा पिणारी मी गटागट चहा घशाखालीं ओतून निघालें. बाहेर एक छत्री होती. काकासाहेबांनीं "ही तुमची आहे का?" म्हणून विचारलें! मीं कधीं आप्पांची छत्री न्याहाळून पाहिली होती? एक-मेकांच्या कारभाराची उठाठेव करण्याची आमच्या घरची रीतच नाहीं मुळीं. छत्री केव्हां आणली, कुठें घेतली, काय पडलें, कशी आहे, मला कशाला त्याची पंचाईत. पण आतां काकासाहेबांना काय सांगायचें? आपलें अज्ञान दाखवायचें? छे! उलट प्रश्न करायचा "तुमची नाहीं ना? मग आमचीच."

असें म्हणून घेतली छत्री, मारली खाकोटीला आणि गांठली सायकल. निघालें घरीं. अरे हो! सईला खेळणें घ्यावयाचें होतें नाहीं का? वाटेंत एका दुकानाशीं थांबलें. आंत जातांना पिशवी पाहूं लागलें. पण ती होती कुठें? दिव्याच्या खुंटीला ठेवली होती. मग? नेली वाटतें कुणी. बरें तर बरे सायकल नाहीं लांबवली. येत नसेल चोराला सायकलवर बसायला. म्हणून नुसतीच पिशवी नेली असेल. माझा अंदाज चुकायचा नाहीं. पण चुकला नी बरोबर असला तरी पिशवी का परत येणार आहे. आतां

सईचें खेळणें कसें घ्यावयाचें ? घेतलें नाहीं तर सटवी जीव खाईल माझा. मग ? हं ! उधार घ्यायचें ! हंसत देईल दुकानदार. नांव आहे ना बापाचें. घेतलें एक किमतीचें खेळणें. हो एवीतेवी पैसे कांहीं आतां द्यावयाचे नाहींत मग उगीच चिक्कूपणा कशाला ? पुडकें सायकलला अडकवून घरीं आलें. आतां शिताफीनें छत्री सांपडून दिल्याबद्दल आप्पांकडून चांगलें बक्षीस उपटायचेंच. हो ! उपटायचेंच म्हटलें पाहिजे. कारण हे कोकणचे भटजी आपण होऊन का कधीं देणार आहेत ? काय उपटावें बरें ? अशीं मनोराज्यें करीत छत्री आप्पांजवळ दिली, तर म्हणतात, " ही नव्हे माझी छत्री. माझी नवीन होती. ही कसली जुनी घाणेरडी आहे. " सीताकान्तस्मरण जयजयराम. सर्व परिश्रम व्यर्थ, उघडून पाहिली तर खरोखरच ती छत्री फाटकी होती. आणि दोन ताराहि मोडलेल्या होत्या. नको असलेली ब्याद तर काकासाहेबांनीं माझ्या गळ्यांत अडकवली नाहींना, असा अधम विचारही माझ्या मनांत डोकावून गेला. आतां पुढें काय ? ती फाटकी छत्री घेऊन फिरून काकासाहेबांकडे जायचें ? कदाचित् त्यांच्याकडे आलेल्या मंडळींपैकीं कोणाची असेल. मघाशीं छत्री नेतांनाच माझ्या ध्यानांत ही गोष्ट यायला हवी होती. पण त्यावेळीं विवेक होता कुठें. जी प्रथम हाताला लागली ती उचलली नी चाललें. म्हणून हा नसता हेलपाटा. शेवटीं काकासाहेबांच्या घरीं पोहोंचले तो ते लिहीत बसले होते. छत्रीचें रडगाणें फिरून गाऊन दाखविलें. मंडळीपैकीं कोणी छत्रीची अदलाबदल झाल्याविषयीं बोललें नव्हतें. कशाला बोलतील ? आपली फाटकी छत्री जाऊन आयती नवी हातीं आल्यावर कोण कशाला बोलेल ? मग आतां काय ? त्या मंडळीपैकीं प्रत्येकाकडे जाऊन चौकशी करायची ? पण आतां ही जुनी छत्री कोण पटवून घेणार ? छे ! हें फुकटचें लचांड झालें. या सगळ्याला कारण काय ? तर आमची दुसऱ्याच्या कारभारांत तोंड न घालण्याची वृत्ति ! आप्पांच्या

छत्रींची खडा न् खडा माहिती असती तर हा प्रसंग का येऊन ठेपता ? पण आतां काय ? हा शोध मध्येंच सोडून द्यायचा ? छे छे—कधींच नाहीं. गीतेंत काय सांगितलें आहे ? कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन । ठरलें. जायचें घरोघरीं. आपण चुकारपणा करायचा नाहीं. प्रत्येकाच्या घरीं जायचे' त्यांच्या ठिकाणांचे पत्ते टिपून घेतलें नशिबानें दोन घरचीच मंडळी होती. हो पांच घरची असती तर काय घ्या. कागद खिशांत घालीत आम्ही बाहेर आलों, तर सायकल बेपत्ता.

. छान. टोपी गेली, पिशवी गेली आणि आतां सायकल. इतकेंहि करून छत्री नाहीं ती नाहींच. देव जशी परीक्षा पाहतो आहे माझी. पाहूं दे. आपणही कांहीं धीर सोडणार नाहीं. त्या छत्रीचा तलास लागेपर्यंत इतर गोष्टींचा विचारसुद्धां करायचा नाहीं. येऊं देत किती संकटें येतात तीं. माझ्या जागीं दुसरी एकादी असती तर ती छत्रीचा विचार सोडून देऊन सायकलच्या मागें लागती. किती झालें तरी सायकल कुठें आणि छत्री कुठें ? पण असली रुपये आणे पै वृत्ति आमच्या गांवींच नाहीं मुळी. आप्पांनीं नाहीं हजारों रुपयांवर लाथ मारून फर्ग्युसन कॉलेजमध्यें ७५ रुपयाची नोकरी पत्करली ? एक ध्येय पुढें ठेवलें कीं तें गांठायचें हें मला ठाऊक ! आप्पांची छत्री हातीं पडेपर्यंत तिचाच शोध करायचा. दुसरी तिसरी बात नाहीं. टिपून घेतलेल्या दोन्ही ठिकाणीं जायचें. आतां सायकल गेली तेव्हां टांगा करणें भाग झालें. पण पैसे होते कुणाजवळ ? दुकानदाराजवळ उधारी मागता येते तशी टांगेवाल्याजवळ थोडीच मागता येईल ? इतक्यांत एक टांगेवाला माझ्याजवळ येऊन थबकला. " बाई टांगा ? "

" हवा आहे पण कवडी नाहीं माझ्याजवळ, चालेल ? " " नसली म्हणून काय झालं ? पैसे कुठं पळून जातात ? मी तुमास्नी न्हान व्हता तवापासून पगतो. कॉलीजांत झगा घालून हिंडत व्हता तवापासून. बसा. "

बरें तर बरें ' झगा घालीत व्हता तवापासून ' म्हणाला. कारण त्याच्या आधींची अवस्थासुद्धां असतेच कीं ? तिचाच उल्लेख केला असता तर काय घ्या. असो. इतका आपलेपणा दर्शवल्यावर टांग्यांत तर बसलेंच पाहिजे. मीं झटकन् कोट उतरला आणि चढून टांग्यांत बसलें. " कुठं जायाचं " असे शब्द कानीं येतांच कागदावरील पत्ते पाहिले. काकासाहेबांनीं ते सांगितले तेव्हां कानांनीं ऐकले होते आणि हातांनीं टिपून घेतले होते, पण ते डोक्यांत कुठे शिरले होते ? चित्त एकाग्र झालें असतां अशीच अवस्था होते. कानानीं ऐकूं येत नाहीं, नाकानें वास येत नाहीं, खाल्लें तरी चव समजत नाहीं, स्पर्श केला तरी कळत नाहीं. ज्या सगुण रूपाचें ध्यान करतां करतां समाधी लागते तेवढें रूपच केवळ मनश्चक्षूंना दिसतें ? मला तरी छत्री-शिवाय दुसरें काय दिसत होतें ? मग टिपून घेतलेल्या पत्त्यांचा बोध कसा होणार ? फिरून पत्ते वाचले तर एक टिळकरस्त्याकडला होता आणि दुसरा शनिवारांतला. असणारच. दोन्ही जवळ जवळ असते तर आमची परीक्षा कठीण कशी होती ? दोन्हीं ठिकाणें शहरच्या दोन टोकाला असायचीं. पहिल्या ठिकाणीं छत्रीचा शोध लागायचा नाहीं हें सर्व विधि–लिखितच असलें पाहिजे. निदान दुसऱ्या ठिकाणीं छत्री दृष्टीस पडो म्हणजे मिळवली ! नाहींतर तेथून ती इतर कोठें प्रवासाला गेलेली असायची. अशा तऱ्हेनें विचार करीत मी पहिल्या ठिकाणीं येऊन ठेपलें. तों केवढें आश्चर्य ! सकाळीं काकासाहेबांच्या घरी भेटलेले एक आबासाहेब टांगा वाजतांच गडबडीनें बाहेर आले आणि मनकवड्याप्रमाणें एकदम म्हणाले, " छत्रीची अदलाबदल झाली ना ? वाटलंच मला. आणलीत का माझी छत्री ! बरं झालं. आज बारा वर्षें ही छत्री वापरतों आहे. फक्त तीनदां कापड बदललं. सकाळीं जेव्हां कां हरवली असं वाटलं तेव्हां काय वाटलं जिवाला तें सांगतासुद्धां येत नाहीं. जरा विचार केल्यावर मलाहि वाटलं कीं चुकून तुम्हीं नेली

असेल. लगेच गड्याला तुमच्या घरीं पाठवलासुद्धां. अहो अगदीं चैन पडेना. ” काय एकेक मासले असतात स्वभावाचे ! कोणाला नेहमीं नवेनवे प्रेमविषय हवे असतात तर कोणाला जुन्याचीच चटक लागते. त्यांचा हर्षवायु जरा ओसरल्यावर टांग्यांतूनच मीं विचारलें,

“ बरे मग आमची छत्री आतां तुमच्या कडे असेल. ”

“ हो खरंच कीं, माझी छत्री सांपडल्याच्या आनंदांत तुमच्या छत्रीचं मी विसरूनच गेलों. पण उतरा कीं खालीं, आतां चहा घेतल्याखेरीज जायचं नाहीं. ” माझ्या मनांतून मुळींच उतरायचें नव्हतें. छत्री सांपडल्याचा अत्यानंद मलाहि झाला होता. आणि ती घेऊन त्याच टांग्यांतून मला सरळ घरीं जायचें होतें. पण आबासाहेबांच्या पुढें माझें कांहीं चाललें नाहीं. त्यांनीं टांगेवाल्याचे पैसे सुद्धां चुकते केले. “ नको, मी देतें ” असेंहि मला म्हणता येईना. तेव्हां निमूटपणें खालीं उतरून त्यांच्या वृद्ध छत्रीचें पुराण ऐकण्याची मनाची तयारी केली. चहा घेतल्यावर मी जायला उठलें. तेव्हां आप्पांची छत्री माझ्या हाती आली. बाहेर पावसाची थोडी बुरबुर होती. तेव्हां आतां एवढ्या अक्कल हुशारीनें मिळवलेलें छत्र ऐटीत डोक्यावर धरून घरीं जायचें ठरलें आणि कोट पाहूं लागले. कोट राहिला टांग्यांत ! बरोबर आहे. टोपी, पिशवी आणि सायकल तिघानांही आयुष्यांत बदल हवासा वाटला. कोटानें तरी आतां दुसरा धनी कां न बघावा ? कांहीं का असेना ! आप्पांची छत्री तर हिकमतीनें परत आणली कीं नाहीं ? विजय म्हणावा तर याला. मध्यंतरी प्रचंड नुकसान झालें म्हणून काय झालें ? कुरुक्षेत्रावर पांडवांनीं विजय मिळवला तेव्हां त्यांचें काय थोडें नुकसान झालें होतें ? माझें त्यापुढें कांहींच नाहीं. बापूसाहेब, काकासाहेब, आबासाहेब, प्रभृति साहेबबहादुरांच्या छावण्यांतून छत्री तर सहीसलामत परत आणली कीं नाहीं ? आप्पा एवढे सीनिअर रँग्लर झाले

पण जन्मांत तरी कधीं त्यांचें डोकें असें चाललें असतें का ? नाहींतर तुमची लेक पहा म्हणावें.

# फ्रेंच लोकांच्या जीवनांत विनोदाचें स्थान ६

फ्रान्स हा देश जरी विनोदाचें आगर म्हणून समजला जात असला तरी फ्रेंच विनोद गोष्टीवजा किंवा चुटकेवजा बहुधा नसतो. तो विजेसारखा एकदम लकलकून मागून विरून जात नाहीं कीं त्यानें पोट धरधरून हंसूं येत नाहीं. पण तो गरीबश्रीमंत, बायकापुरुष, आबालवृद्ध या सर्वांच्या ठायीं सकाळपासून संध्याकाळपर्यंत, झोंपेंत आणि जागेपणीं सारखा नाजुक नाजुक गुदगुल्या करीत असतो. 'संशय कल्लोल', 'मारून मुटकून वैद्यबुवा', 'रावबहादुर पर्वत्या' वगैरे जीं फ्रेंच नाटकांचीं सुंदर रूपांतरें मराठींत झालीं आहेत, त्यावरून फ्रेंच विनोदाची कल्पना येते. तो विनोद प्रसंगनिष्ठ व स्वभावनिष्ठ असतो. त्यांत शब्दांच्या कोट्या, किंवा बीभत्स रस फारसा आढळत नाहीं. फ्रेंच माणूस कितीही दुःखांत अथवा अडचणींत असला तरी त्याला आयुष्यांतील विनोदी बाजू कधींहि दिसल्याशिवाय रहात नाहीं.

## सावकार व चोर

एकदां एक सावकार एका कुळाकडून आपली रक्कम वसूल करून घरी जात होता. याचा सुगावा एका चोराला लागून त्यानें वाटेंत त्याला गांठून पिस्तुलाची त्याला भीति दाखवून त्याच्या कोटाच्या आंतल्या खिशांतील पैशाचें पाकीट लांबवलें व तो चोर परत जाऊं लागला. इतक्यांत सावकार म्हणतो " अहो दोस्त ! जरा थांबा. माझ्या विजारीच्या खिशांत आणखी चार सुटे पैसे उरले आहेत तेही घेऊन जा. मला त्यांची अडचण होत आहे." चोरानें हंसत उत्तर दिलें " उदार पुरुषा ! मला सध्यां त्यांची जरूरी नाहीं. तेव्हां असं करा कीं तुम्हाला रस्त्यानें जो पहिला भिकारी भेटेल त्याला माझी आठवण काढून ते चार पैसे देऊन टाका म्हणजे आपणां दोघांनाही पुण्य लागेल; खरं कीं नाहीं ? बरं, रामराम. " या गोष्टीवरून उत्तरप्रत्युत्तर देण्यांत फ्रेंच लोक किती पटाईत असतात याची कल्पना होते.

## जांवई पसंत पडला

एकदां माझ्या एका फ्रेंच मैत्रिणीची एका तरुणाशीं पुष्कळ ओळख झाली. त्यांचें एकमेकांवर सपाटून प्रेम बसलें व त्या दोघांनीं लग्न करावयाचें ठरवलें. आणि त्याप्रमाणें माझ्या मैत्रिणीनें ही बातमी आपल्या आईला कळवली व भावी जांवयाची ओळख करून देण्यासाठीं तिनें आईला व आपल्या मित्राला सरोवराकांठीं उपाहारगृहांत चहाला बोलावलें. चहानंतर तीं तिघें एका लहानशा होडींत बसून सरोवरावर हवा खायला गेलीं. तो एकटाच वल्हवीत होता व वल्हवण्यांत तो मोठा पटाईत होता. होडी किनाऱ्यापासून बरीच दूर गेली. गप्पाटप्पा थट्टामस्करी चालली होती. सासूबाईंना जांवई पसंत पडलासा दिसत होता. इतक्यांत त्यांनीं त्याला विचारलें,

" कायहो तुम्हांला पोहतां येतं का ? "

त्यानें सविनय उत्तर दिलें " येतं थोडसं. " सासूबाई पुन्हा विचारतात " बुडणाऱ्या माणसांना बचावण्याइतकं ? " जांवईबुवांनीं उत्तर दिलें " होय. पण एका वेळीं एकाच माणसाला बचावतां येईल, कारण बुडणाऱ्या माणसाला धरायला एक हात लागतो व पोहायला एक हात लागतो. "

तुम्ही कोणाला वांचवाल ?

हें ऐकतांच सासूबाईंचे डोळे चमकले व त्यांनीं खोचून विचारलें " अस्सं होय ? मग समजा, ही होडी कलंडली आणि आम्ही दोघी बुडूं लागलों तर तुम्ही मला वांचवाल कीं माझ्या मुलीला ?" जांवई एक क्षणाचाही विचार न करतां म्हणाले " मी आपल्याला कांठांपर्यंत सुरक्षित नेऊन पोचवीन व परत येऊन मी माझ्या मैत्रिणीबरोबर जलसमाधी घेईन. " हें उत्तर ऐकून सासूबाई बेहद्द खूष झाल्या आणि माझ्या मैत्रिणीला तर अस्मान ठेंगणें झालें !

या गोष्टीवरून आपल्याला दिसून येईल कीं शिष्टाचार व सौजन्य हे गुण विनोदाइतकेच फ्रेंच लोकांच्या ठायीं मुरलेले आहेत. फ्रेंच लोक वादांत आपल्या प्रतिस्पर्ध्याला अगदीं चीत करतील; परंतु उद्धटपणें कधीं बोलणार नाहींत. उपहासांत तर ते कोणालाच हार जाणार नाहींत. परंतु त्यांचा उपहास नेहमीं मार्मिक असतो. नुसत्या शिव्यांची मालिका ते कधींच गुंफीत बसणार नाहींत, किंवा उर्मटपणें कुणाची टर उडवणार नाहींत.

१८८७ च्या सुमारास फ्रान्समध्यें *Boulanger* ( बुलांजे ) नांवाचा एक जनरल होऊन गेला. तो फार लोकप्रिय झाला होता व तो नेपोलिआंप्रमाणें सर्व देशाचा पुढारी होईल कीं काय अशा प्रकारची भवति न भवति त्यावेळीं होत असे. खरोखर पाहिलें असतां जनरल बुलांजे अगदीं सामान्य प्रतीचा माणूस होता व ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं आपला जीव वांचवण्याकरितां पळ काढून त्यानें आपली खरी अथवा खोटी किंमत फ्रेंच लोकांना पुढें पटवून दिली. परंतु त्याच्या भरभराटीच्या दिवसांत एकदां

मोठा वाद माजला व जनरल बुलांजेच्या बाजूनें पुष्कळ लोक बोलले व प्रत्येकानें हा एक प्रतिनेपोलिआँ आहे किंवा हा एक सवाई नेपोलिआँच आहे अशा अर्थाचे उद्गार काढले.

प्रतिपक्षांतील लोकांनीं हीं स्तुतिस्तोत्रें बराच वेळ ऐकून घेतलीं व त्यांच्या पुढाऱ्यानें उठून गंभीरपणें बोलायला सुरवात केली. तो म्हणाला "आज ६० वर्षांच्या एका व्यक्तीची नेपोलिआँबरोबर बरीच तुलना केली जात आहे. पण सज्जनहो, लक्षांत ठेवा कीं नेपोलिआँच्या वयाला जेव्हां ६० वर्षें पुरीं झालीं त्यावेळीं तो सत्पुरुष केव्हांच मरून गेला होता!"

ब्लूम यांचें राजकारण

परवां ग्रँग्वार नांवाचें एक फ्रेंच वर्तमानपत्र वाचतांना *Blum* (ब्लूम्) आणि त्याचे अनुयायी यांच्या राजकारणाविरुद्ध एक लेख माझ्या नजरेस आला; त्याचा गोषावारा मी आपणाला सांगतें.

ब्लूम आणि मंडळी फ्रान्सचे मंत्री नसून स्टालीनचे मंत्री आहेत; त्यांना फ्रान्सचें हित साधायचें नसून सोव्हिएट रशियाचें कल्याण करायचें आहे. फ्रान्सला त्यांना लढाईत खेंचायचें आहे. रशियाच्या भजनीं लागून त्यांनीं अनेक फ्रेंच तरुणांचे स्पेनमध्यें बळी दिले आहेत आणि सोव्हिएट रशियाला खूष ठेवण्याकरतां ते फ्रेंच सैन्य चीनच्या मदतीला पाठवण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहेत. आम्हीं रशियाकरितां कां लढावें? रशियानें आमच्याकरतां काय केलें आहे? आपला डाव साधण्याकरतां त्यांनीं इटलींत व आमच्यांत वांकडें आणलें. महायुद्धांत ऐन वेळीं आमचा विश्वासघात केला आणि आमचे कर्जाऊ घेतलेले कोट्यावधि फ्रँक साफ परत करण्याचें नाकारलें. आम्हीं त्यांना कां सहाय्य करावें? ब्लूम प्रभृति मंडळींना सोव्हिएट रशियाकरितां लढायचें असेल तर खुशाल त्यांनीं स्वतः तांबडे भडक पोशाख घालून स्टालीनच्या सैन्यांत दाखल

व्हावें. आणि रक्ताचे सडे व प्रेतांच्या राशी पाहिल्यावांचून त्यांची राक्षसी तहान भागत नसेल तर त्यांनीं आपल्या कंपूंतूनच ही सामुग्री पुरवावी.

आमची खाशी स्वारी

याच वर्तमानपत्रांत एकदां एका लेखकाला तो अफू पीत असतांना सांपडल्यामुळें, पकडून तुरुंगांत टाकल्याबद्दलची हकीकत सांगतांना बातमीदार लिहितोः—चीन देशांत तर अफू पिणाऱ्या लोकांना देहान्त शिक्षा देतात. त्यांची निशा उतरवण्याचा हा उपाय निःसंशय अधिक परिणामकारक आहे. व्होल्तेअर या प्रसिद्ध फ्रेंच लेखकाचें नांव आपण सर्वांनीं ऐकलें असेलच. त्याचें लिखाण फार क्रांतिकारक व त्याची लेखणी मोठी तीक्ष्ण असे. व त्यामुळें त्याचें लिखाण अनेक वेळां जप्त केलें जात असे व केव्हां केव्हां त्याला पकडण्याचे हुकूमही सरकारांतून सुटत असत. त्यापासून स्वतःचा बचाव करण्यासाठीं तो फ्रान्सच्या सरहद्दीवर रहात असे. मरणाच्या आधीं तो एकदां फ्रान्समध्यें येत असतां त्याला देशाच्या हद्दीवरच्या अधिकाऱ्यांनीं विचारलें कीं " फ्रान्समध्यें नेण्यास बंदी असलेल्या कांहीं वस्तू तुमच्याजवळ नाहीत ना ? " व्होल्तेअरनें गालांतल्या गालांत हंसत उत्तर दिलें, " फ्रान्समध्यें नेण्यास बंदी असलेली वस्तू ना ? असली तर आमची खाशी स्वारी ही एवढीच एक वस्तू असूं शकेल. "

नोकरही विनोदी

नोकरचाकरसुद्धां आपलें काम करीत असतांना आपल्याला हंसायला संधी केव्हां मिळेल याची जणूं वाटच बघत असतात. एकदां दुपारीं तिहींच्या सुमारास मी एका दुकानांत कॉफी प्यायाला गेलें, ही वेळ म्हणजे सर्वांची ऐन कामाची वेळ. तेव्हां त्या कॉफीचें दुकान त्यावेळीं अगदीं रिकामें होतें.

व तेथें गिऱ्हाईक अशी मी एकटीच होतें. कांहीं वेळानें एक माणूस तेथें आला. त्याच्या पोषाकावरून तो जर्मन असावा असा अंदाज मीं बांधला. तो एका टेबलाशीं बसला; मग उठून दुसऱ्या टेबलाजवळ जाऊन बसला; तेंही त्याला पसंत पडलें नाहीं म्हणून फिरून उठून इथें बस, तिथें बस, अशी त्याची चुळबूळ चालली होती.

दुकानांतला नोकर हा प्रकार बघत होता व त्या गिऱ्हाईकाजवळ जाऊन गंभीर मुद्रेनें म्हणतो " नाहीं ना कुठेंच जागा सांपडत ? अहो ! गर्दीच्यावेळीं हें असंच चालायचें."

त्याची ही मल्लीनाथी ऐकून मला तर हंसूं आवरेना; असो.

विडी ओढण्याची परवानगी

कॉफी घेऊन झाल्यावर मी एका सिनेमाला गेलें. त्यावेळीं मी बऱ्याच विड्या ओढीत असें; फ्रान्समध्यें कांहीं सिनेमांतून विडी ओढण्याची मनाई असते. म्हणून मला माझ्या जागीं नेऊन बसवणाऱ्या इसमाला मीं विचारलें " इथें विडी ओढायची परवानगी आहे का ? "

तो प्राणी एक डोळा मिटून हळूच म्हणतो " विडी ओढायची परवानगी ना; आहे बाईसाहेब, चोरून ओढण्याची आहे परवानगी ! "

विनोदाचें बाळकडूं अगदीं उपजतच मुलांना पाजलें जातें; फ्रान्समधील बोबडीं बोलणारीं मुलेंसुद्धां अशीं चुणचुणींत उत्तरें देतात कीं, एखाद्या वकिलालाही निरुत्तर करतील. माझी तीन सव्वातीन वर्षाची एक ' मोठी ' मैत्रीण होती. तिचें नांव निकोल्. एक दिवस स्वारीनें घरांत बरेच कारभार केले होते व संध्याकाळीं तिची आई त्या सर्व पराक्रमाचा पाढा माझ्याजवळ वाचीत होती. निकोल जवळच बसून ठोकळयांशीं खेळत होती. नजर होती ठोकळयांकडे, पण कान होते आईच्या बोलण्याकडे.

भंडावून सोडण्याचा निश्चय

मला सर्व गाऱ्हाणीं सांगून झाल्यावर तिची आई म्हणते " बघा, बघा ! कशी साळमुदासारखी बसली आहे ! आतां येतं आहे कां ऐकायला माझं बोलणं ! "

निकोल आपले ठोकळे मांडीतच बोबड्या बोलांत बोलते, " नाहीं आई; मी किनी अगदीं बहिरी आहे ! "

ह्याच माझ्या छोट्या मैत्रिणीबरोबर खेळण्यांत फिरण्यांत मी तासच्या तास घालवीत असें. एक दिवस आम्ही दोघी फिरायला गेलों असतां तिनें मला भंडावून सोडायचें मनांत घेतलें होतें. मी कांहीं सांगितलें तरी तिचा आपला एक प्रश्न " कशासाठीं ? "

मी शेवटीं कंटाळलें व म्हटलें " हें बघ निकोल, आतां फिरून तूं जर मला ' कशासाठीं ? ' म्हणून विचारलंस तर मी तुझं नकटं नाक खाऊन टाकीन ! "

तरी बाईसाहेब लगलीच विचारतात, " कशासाठीं ? " आतां काय बोलणार मी ! तिचा एक मुका घेऊन गप्प बसलें.

थोडें पुढें गेल्यावर स्वारीनें मला भंडावून सोडायची दुसरी एक युक्ति शोधून काढली. जें कांहीं नजरेस पडेल तें काय आहे, म्हणून विचारायचें. मग ती वस्तू माहीत असली तरी सुद्धां. कांहीं वेळ मीं तिच्या प्रश्नांचीं सरळ उत्तरें दिलीं. " मोटार, घोडा, झाड, सायकल दिवा, ट्रॅम " वगैरे.

तो हत्ती आहे !

इतक्यांत एक कुत्रें समोरून गेलें. राणीसाहेबांनीं विचारलें " तें काय आहे ? "

मीं सांगितलं " तें ना ? तो एक हत्ती आहे. "

निकोल म्हणते " हत्ती इतका लहान असतो वाटतं " ?

मीं म्हटलं " नाहीं का ? "

ती फिरून म्हणते, " आणि त्याला सोंड नसते वाटतं ? "

मीं म्हटलं, " खरं का ? "

निकोल पुढें विचारते, " आणि त्याचे कान तरी असे असतात का ? "

मीं प्रश्न केला, " मग ? "

त्यावर ती निकोल ठासून सांगते, "तो कुत्रा आहे, हत्ती नाहीं कांहीं ! "

तेव्हां मी जरा चिडून म्हटलं " माहीत होतं तर मग मला ग कशाला विचारलंस पोरटे ? "

निकोलचें उत्तर तयारच होतें " तुला माहीत आहे कीं नाहीं तें पाहण्यासाठीं ? "

मैत्रिणीची ओळख

आमची अशी फजिती झाल्यावर आम्ही थोड्या पुढें गेलों तों तिच्या आईच्या ओळखीची एक बाई येतांना तिनें पाहिली आणि मला म्हणते " चल आपण तिच्याकडे जाऊं ? "

मीं म्हटलें " नको, माझी तिची ओळख नाहीं. "

त्यावर निकोल तोंड काढते " मग मी देईन ना तुमची ओळख करून. लाजतेस काय, चल. "

तेव्हां मीं विचारलें, " कशी ओळख करून देशील ग ? मी तुझ्या आईची मैत्रिण म्हणून ? "

निकोलला तें पटलें नाहीं " आईची कां म्हणून ? माझी मैत्रिण म्हणून ओळख करून देईन. "

फिरून झाल्यावर आम्ही तिच्या घरीं गेलों व स्वारीनें मला जेवायला ठेवून घेतलें व मी माझे हात आणि तोंड धुवायला मोरींत गेलें. निकोलही माझ्या पाठोपाठ आली. मी तोंडाला साबण फांसला व तो धुवून काढतां काढतां थोडासा माझ्या डोळ्यांत गेला व मी "आई आई" म्हणून जराशी ओरडलें.

बाईसाहेब विचारतात, "कां ओरडलीस?" मीं म्हटलें, "साबण डोळ्यांत गेला म्हणून."

स्वारी अगदीं खूष होऊन म्हणते, "मग माझ्यासारखीच वेडी आहेस तर तूं!" आमचें जेवण संपलें तरी स्वारीनें "इथंच राहिलं पाहिजे" म्हणून माझा पदर धरून ठेवला.

"मी उद्यां येईन" वगैरे सांगून पाहिलं पण कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस मीं म्हटलें, "मी राहीन पण मला तुझ्या पलंगांत तुझ्याजवळ निजूं देशील?"

निकोल माझ्याकडे पायांपासून डोक्यापर्यंत पहात व पदराचें टोंक सोडून देत म्हणते, "माझा पलंग कांहीं फार मोठा नाहीं आहे कांहीं."

### टोपीचा सत्यानाश

निकोलची आई जेर्मेन व बाप एदमां यांचीहि अर्थात् माझी फार दोस्ती होती. एक दिवस त्या दोघांचें जरासें बिनसलें होतें. तिला हवी होती नवी टोपी; आणि तो म्हणत होता, इतक्यांत कांहीं जरूर नाहीं. त्यांचीं दोघांचीं तोंडें दोन दिशेला व माझें मध्यें अशीं आम्ही तिघें बाहेर निघालों. त्या दिवशीं खूप पाऊस पडत होता व जेर्मेन ट्रॅममधून उतरतां उतरतां पाय घसरून खालीं पडली. तिच्या हातांतील पिशवी व डोक्या-वरची टोपी उडून चिखलांत पडली. तिचा नवरा तिला सांवरायला धांवतां

धांवतां त्याचा पाय तिच्या टोपीवर पडून तिचा पुरता सत्यानाश झाला. जेर्मेनच्या डोक्याला बरेंच लागलें होतें व रक्तहि येत होतें; पण तिकडे बिलकूल लक्ष न देतां तिनें उडी मारून एका हातानें ती सपाट झालेली टोपी उचलली व दुसऱ्या हातानें चिखलानें भरलेली पिशवी उचलीत नवऱ्याला म्हणते, " सांगा आतां; आहे कीं नाहीं जरूर नवी टोपी घ्यायची ? आणि जोडीला पिशवीची सुद्धां ? "

तिच्या कपाळावरचें रक्त रुमालानें पुशीत तिचा नवरा म्हणतो, " थोडक्यांत चुकलं, नाहींतर तुझी टोपी आणि पिशवी बाजूलाच राहून मलाच नव्या बायकोची जरूर पडली असती ! "

वाढदिवसाचा आनंद

एक दिवस माझ्या वाढदिवसानिमित्त मीं ह्या दोघांना व आणखी दोन तीन मंडळींना संध्याकाळीं जेवायला बोलावलें होतें; जेवण झालें; पत्ते खेळून झाले. गाणीं म्हटलीं. ग्रामोफोन लावून नाचायला सुरवात झाली. रात्रभर मंगळागौर जागवायची असें माझ्या मित्रमंडळींनीं ठरवलें. निकोलचा बाप फार रंगांत येऊन मोठमोठ्यानें गात होता.

मीं त्याला म्हटलें, " जरा हळू गा. समोरच्या खोलींत एक भाडेकरी आहे तो निजला असेल; त्याला आपल्या कटकटीचा त्रास होईल. "

माझें बोलणें संपतें न संपतें तोंच तो एकदम माझ्या खोलींतून झटकन् बाहेर निसटला व समोरच्या खोलीच्या दरवाज्यावर ठोठावीत त्या गृहस्थाला विचारतो, " काय हो झोंप लागली आहे ना तुम्हांला ? माझ्या गाण्याचा त्रास नाहीं ना होत ? "

तो गृहस्थ डोळे चोळीत चोळीत बाहेर येऊन म्हणतो, " माझ्या खोलींत होतो बुवा त्रास; पण तुमच्या खोलींत येऊन बसलों तर नाहीं होणार कदा-

चित्. '' झालें; लागलीच तोहि आमच्यांत सामील झाला व एकच हंशा पिकला.

दुसऱ्या दिवशीं रात्रींच्या जाग्रणानें व अचकट विचकट खाण्यानें निकोलच्या बापाला अपचन झालें व बऱ्याच उलट्या वगैरे झाल्या. दुपारीं मी त्यांच्या घरी समाचाराला गेलें व उलट्या वगैरे थांबल्या कां म्हणून त्याला विचारलें.

तो म्हणतो, " नाहीं बुवा थांबत. मला वाटतं यावेळेस मलाच दिवस गेले असावे. कायग जेर्मेन, तुझं काय मत आहे ? '' म्हणून आणखी बायकोला विचारतो.

आनंदी जीवन

फ्रेंच लोक ऐहिक सुखाला तुच्छ मानीत नाहींत. दुसऱ्याला उपद्रव न करतां संसारांत जितक्या सुखांचा उपभोग घेतां येईल तितका घ्यावा, जितकी चैन करतां येईल तितकी करावी, जितकें हंसतां येईल तितकें हंसावें अशा वृत्तीचे ते लोक आहेत व म्हणूनच ते दुसऱ्यांच्या उठाठेवी फारशा करीत नाहींत. कारण एक तर त्यांना वेळ नसतो, त्यांना स्वतः संसाराचा शक्य तितका आस्वाद घ्यायचा असतो व दुसरें स्वतःच्या इच्छा एकदां तृप्त झाल्यावर त्यांना दुसऱ्याच्या सुखाचा हेवा वाटत नाहीं. नसत्या कुशंका काढून फ्रेंच लोक कधीं संकटांना सामोरे जात नाहींत किंवा काल्पनिक काळज्यांचा खल करून ते चिंतेला कधीं पाचारण करीत नाहींत.

आज जग हंसतें आहे ना ? चला, हंसू या. उद्यांचें उद्यां बघून घेतां येईल; अशा हंसऱ्या वृत्तीनें ते प्रत्येक दिवस साजरा करीत असतात.

दुखणेकऱ्याची गोष्ट

एकदां एक दुखणेकरी एका फ्रेंच डॉक्टरकडे गेला व म्हणाला, " डॉक्टर, मी लवकर मरणार असं मला वाटत आहे ! ''

डॉक्टर विचारतात, “ कां हो, काय होतं आहे तुम्हांला ? ”

तो माणूस उत्तर करतो, “ पहा ना तुम्हीच तपासून. पण मी कांहीं फार दिवस जगत नाहीं खास. ”

डॉक्टरांनीं तपासायला सुरवात केली व ते विचारतात, “ विड्याबिडया फार पितां का ? ”

तो उत्तर देतो, “ छे हो, कधीं जन्मांतसुद्धां विडी फुंकली नाहीं. ”

डॉक्टर म्हणाले, “ असं ? तर मग तुम्ही दारू जरा जास्त पीत असणार ! ”

तो माणूस म्हणतो, “ अहो नाहीं. मी दारूच्या एका थेंबालासुद्धां कधीं शिवलों नाहीं. ”

सुंदर स्त्रियांचं व्यसन

डॉक्टर भुवया जरा वर चढवून म्हणतात, “ काय विडीहि नाहीं आणि दारूहि नाहीं ? हां, मग आतां ओळखलें. सुंदर स्त्रियांचें व्यसन असणार तुम्हांला ! ”

तो माणूस गंभीर मुद्रा करून म्हणतो, “ शिव शिव ! मी अगदीं कड-कडीत ब्रह्मचारी आहें ! ”

हें ऐकतांच डॉक्टरनीं स्टेथॅस्कोप खालीं ठेवला व ते विचारतात, “ अहो, महाराज ! मग तुम्हांला जगायचं आहे तरी कशाकरितां ? ”

शब्दांच्या लडाईत फ्रान्समध्यें कोणीच कोणाला हार जात नाहीं. मग खुद्द नवराबायकोंतच अशातऱ्हेची चकमक उडाल्यावर दोघांच्या शब्दश्रीचा महिमा काय वर्णावा ?

पावसांत भिजलेली नवराबायको

मिशेल ड्यूरां यांच्या *Trois Six et Nenf* या नाटकांतील एका

प्रवेशांत पावसांत भिजलेलीं नवराबायको एका खेडेगांवांतल्या घरांत येतात. ती आपली भिजून चिंब झालेली टोपी काढूं लागते. नवरा तिच्या टोपीकडे बघत म्हणतो, " अहाहा, काय पण रूप दिसतं आहे तुझ्या टोपीचं ! काढण्याच्या आधीं एका आरशांत बघ. "

बायको टोपी काढून तिच्याकडे दुःखानें पहात म्हणते, " चूच्च्. परवांच विकत घेतलेली टोपी. तें कांहीं नाहीं; ही सारी तुमचीच चूक आहे. पाऊस संपेपर्यंत आपण आणखी तिथेंच थांबायला पाहिजे होतं. "

नवरा म्हणतो, " अग, पण तिथून निघालों तेव्हां पावसाला सुरवात तरी कुठें झाली होती ? "

लागलीच बायको उत्तर देते, " हो, पण लवकरच मोठी सर येणार हें अजमावायला कांहीं पंचांग बघायची जरुरी नव्हती. "

नवरा उपरोधिकपणें हंसून म्हणतो, " जसं कांहीं तुझ्या ध्यानांत आलंच होतं. "

ती जोरांत सांगते, " अर्थातच आलं होतं. "

फिरून नवरा खोंचून म्हणतो, " तर मग बाईसाहेब नवी टोपी काढून जुनी घालावी एवढीसुद्धां बुद्धि तुम्हांला झाली नाहीं ना ? "

बायको टोला लागलीच परत करते, " कारण तुम्हीच म्हणाला होत कीं, दोनच मिनिटांचा रस्ता आहे मग कशाला बदलूं टोपी ! मात्र तंगड्या तोडीत तासभर रखडवतां आहांत. "

नवऱ्याचें उत्तर आहेच, " तूं जरा पाय उचलला असतास तर आपण पाऊस येण्याच्या आधीं केव्हांच येऊन पोंचलों असतों. तुला इतकं रेंगाळत चालायला कुणीं सांगितलं होतं ? "

बायको फणफणत म्हणते, " असले उंच टाचांचे बूट घालून तुम्ही तरी दाखवा या खेडवळ रस्त्यांतून भराभर चालून ! "

नवऱ्याचें प्रत्युत्तर आहेच, " उंच टाचांचे बूट नसले म्हणून काय झालें ? दोन्हीं पेटयांचीं ओझीं तर मीच वाहातों कीं नाहीं ? आणि तरीसुद्धां सारखा चार पावलं तुझ्यापुढेंच चालतों आहे. "

बायको कुरकुरत म्हणते, " हो, मला एकटीला मागें टाकून ! "

नवरा विचारतो, " मग काय तुला आणखी डोक्यावर घेऊं कीं काय ? "

बायको फिरून मूळ पदावर येते, " तरीसुद्धां माझ्या टोपीचं वाटोळं व्हायचं थोडंच राहाणार होतं ? "

नवरा म्हणतो, " हो आणखी तो दुकानदार टोपी उधार घ्या म्हणत होता तो मी रोख पैसेसुद्धां देऊन बसलों ! "

बायकोचें म्हणणें आहेच, " तेंच बरं झालं. नाहींतर आतां त्या टोपीची पुरती वाट लागल्यानंतर वर आणखी पैसे द्यायचे असते म्हणजे मनाला जास्तीच चटका बसला असता. "

हा वाद येथें संपला असें आपण समजूं नये; पण माझी भाषणाची वेळ संपली तेव्हां आतां नमस्कार !

( रेडिओवरील भाषण ) ता. ९ ऑक्टोबर १९३८

## घोडागाडी

## ७

सईला घेऊन मी सुमारे तीन महिने दक्षिणेंत भटकत होतें. व्यंकोबाच्या गिरीपासून तीर्थयात्रेला सुरवात केली. लग्नबिग्न कांहीं केलें नाहीं. नुसताच देवाला नमस्कार केला. भटकत भटकत थेट लंका गांठली. माझी एक जुनी मैत्रीण बरोबर होती. शाळेपासूनची मैत्री. मग काय विचारतां, एकमेकीपासून झांकलेलें असें कांहींच नाहीं. शिष्टपणाचें सोंग एक क्षणभरसुद्धां टिकणें शक्य नव्हतें. शिवाय परका मुलूख, परकी भाषा, ना ओळख ना देख. दोघींनाहि जीव अगदीं खालीं पडल्यासारखा वाटला. ती पडली डॉक्टरीण. सदानूकदा तोच पेशा. स्वस्थपणें झोंपसुद्धां घेतां येत नाहीं या लोकांना. त्यांतून डॉक्टरणींना तर मुळींच नाहीं. कारण आम्हां बायकांचीं पोटें हटकून रात्रींच दुखायला लागायचीं आणि यांना बिचाऱ्यांना रोजचीं जाग्रणें व्हायचीं. " शकू, अगदीं कुठें तरी लांब जाऊं. जिथें आपल्याला कोणी ओळखणार नाहीं आणि

' डॉक्टर ' हें संबोधनहि कानीं येणार नाहीं अशा ठिकाणीं जाऊं. " मला तरी तेंच पाहिजे होतें. म्हणून दक्षिणेंत जायचें ठरविलें. अगदीं शाळेंतल्या मुलींप्रमाणें वागून घेतलें. हंसलों काय, भांडलों काय, एकमेकींच्या खोड्या काय काढल्या, लोकांच्या चेष्टा काय केल्या. खा खा खाल्लें काय, भटक भटक भटकलों काय, पाण्यांत डुंब डुंब डुंबलों काय ! आमचें आम्हांलाच ठाऊक. केव्हां केव्हां लोक जरा टवकारून पाहत. पण तिला कोणी ' डॉक्टर ' म्हणून हटकीत नसे आणि " सुप्रसिद्ध बापाची हीच ती कुप्रसिद्ध मुलगी " म्हणून माझ्या पाठीमागें कोणी खाकरीतहि नसे. त्यांतून एखाद्या गांवीं राहण्याची अगदींच सोय होणार नाहीं अशी भीति वाटली कीं, मी पटकन् बापाचें नांव खिशांतून बाहेर काढीत असें. लगेच बडदास्त अशी उत्तम ठेवली जाई कीं, ' वाटे, खरंच आपला बाप फार मोठा माणूस असला पाहिजे ! ' त्रावणकोर व म्हैसूरमध्यें तर ही समजूत अगदीं दृढ झाली. राहायला पहिल्या प्रतीचे सरकारी बंगले, थाटाचें जेवण, हिंडायला भली थोरली सलून गाडी; आणि प्रेक्षणीय स्थळें दाखवायला कसलेला वाटाड्या ! या तीन महिन्यांत मीं इतकीं स्थळें पाहून घेतलीं कीं, नुसती यादी दिली तरी वाचणारे कंटाळतील, मग वर्णन तर बाजूलाच राहिलें. आणि हें सर्व फुकट बरें का ! अथवा बापाच्या पुण्याईवर म्हणा हवें तर. पण बापाची तरी कसली, माझीच पुण्याई म्हटली पाहिजे. कारण याच सुमारास आमचे आप्पा स्वतःच बंगलोरला महिनाभर कांहीं कामाकरितां राहिले होते. पण त्यांनीं शिवसमुद्र पाहिला नाहीं. वृंदावनाला गेले नाहींत, गिरसप्पाचा धबधबा पाहिला नाहीं, कीं भद्रावतीला भेट दिली नाहीं. फार काय, खुद्द बंगलोरचीच ' टाटा रिसर्च इन्स्टिटयूट ' सुद्धां पाहिली नाहीं. " कांहीं, कांहीं कसं पाहिलं नाहींत ? " असें विचारलें तेव्हां म्हणतात, " कसं जायचं कुठें ? ओळख नाहीं माझी कुणाची. उगीच कुठें जायचं ? " खरी गोष्ट आहे. गरीब बिचारे ! कोण

ओळखणार कोंकणांतल्या या गरीब ब्राह्मणाला? माझा बाप असेल सर्वांना माहीत आणि मला असेल सगळीकडे मुक्तद्वार! पण या भटजीबुवांना कोण ओळखणार आणि कोण काय दाखवणार?

एकंदरींत मी परत आलें तेव्हां वडिलांवर बेहद्द खूष होतें. त्यांतून वाटेंतच त्यांना ‘सर’ ही पदवी मिळाल्याचें कळलें होतें. तेव्हां तर अगदीं ठरवून टाकलें कीं, आपण फार थोर पुरुषाच्या पोटीं —‘पुरुषाच्या पोटीं’ म्हणतात का?—जन्माला आलों आहोंत. आतां तर बादशाही शिक्का मिळाला, मग काय पाहिजे? “शाबास सर रघुनाथ” अशी सईच्या नांवाची तार ठोकली व कारवारला जायचा बेत रद्द करून सरळ पुण्याचा रस्ता धरला. पुण्यास आलों तर आप्पा होते तसेच दिसत होते. पोट, मिशा कांहींच वाढलें नव्हतें. टेबलावर पत्रांचा आणि तारांचा मात्र नेहमीपेक्षां मोठा ढीग पडला होता; आणि मान मोडून बिचारे उत्तरें लिहीत होते. संध्याकाळीं एके ठिकाणीं सत्काराचें जेवायला जायचें होतें. तर हे भटजीबुवा आपले ‘बशींतून’ गेले आणि भाड्याच्या टांग्यांतून खडखड करीत परत आले. मावतसुद्धां नाहींन भाड्याच्या टांग्यांत! काय करावें यांना! ‘सर रघुनाथ’ झाले तरीसुद्धां बशींतून जायचें आंणि टांग्यांतून यायचें म्हणजे काय हा दरिद्रीपणा! आपल्या मोठेपणाची कांहीं तरी पर्वा केली पाहिजे कीं नाहीं! नात्याची किंवा ओळखीची मंडळीहि माझ्या कानाशीं कुजबुजूं लागली, “आतां आप्पांना हें असं वागणं मुळींच शोभत नाहीं. शकू, तूं आतां त्यांना एक मोटार घ्यायला लाव.” मलाहि कांहीं तरी केलें पाहिजे असें वाटूं लागलें. शिवाय मी दक्षिणेंत जाण्यापूर्वीच आप्पांनींहि आपला दोन वर्षांचा जमाखर्च पडताळून पाहतां पाहतां एकदा मोटार घेण्याची गोष्ट काढली होती. पण त्या वेळीं मींच मोडता घातला होता. “पेट्रोल आतां दिवसेंदिवस मिळेनासें होत आहे. आतां मोटार घेऊन काय रोज तिची पूजा करायची

आहे ? शिवाय मला मोटार मुळींच आवडत नाहीं. मळमळतं मला मोटारींत ! आणि इथल्या इथें पर्णकुटींत जायला हवी कशाला मोटार ? ” आप्पा तरी मोटारशिवाय कुठें एवढे सुकले होते ! असली ही श्रीमंती कल्पना त्यांच्या कोंकणी डोक्यांत डोकावली हेंच महदाश्चर्य ! झालें. तो मोटारचा प्रश्न तितकाच राहिला. परंतु मीं मात्र एवढें संधान बांधलें कीं, दर महिन्याला स्वारीजवळ खर्चायला अधिक पैसे खचित् शिल्लक राहत असले पाहिजेत. एरवीं का म्हातारपणीं मोटारचे डोहाळे लागते ?

आप्पा ‘ सर ’ झाल्यावर मला या प्रसंगाची आठवण झाली व डोक्यांत जोरानें विचार सुरू झाले. आप्पा महिना सव्वा महिन्याकरितां दिल्लीला जाणार होते. जातांना नेहमींप्रमाणें महिन्याची ठरीव रक्कम देऊन, ‘ आणखी पैसे हवेत का ? ’ म्हणून त्यांनीं मला विचारलें. खरें म्हणजे मी दक्षिणेंत गेलें, तेव्हां त्यांच्याकडूनच हजारबाराशें रुपये खर्चाला घेतले होते व ते दर महिन्याला हप्त्याहप्त्यानें फेडीन असें वचन दिलें होतें. पैसे फेडायचे ते अर्थात् त्यांच्याच पैशांनीं त्यांचेच पैसे फेडायचे. गुळाचाच गणपति आणि गुळाचाच नैवेद्य. परंतु आमची महिन्याची रिकामपणची मिळकत ठरलेली आहे. तेवढ्यांतच काय होतील तीं सोंगें मला करतां येतात. प्रवासाकरितां जादा रक्कम मंजूर होत नाहीं. लोकांना आपलें वाटतें कीं, एकुलती एक मुलगी आहे, बापाचा पैसा उडवीत असेल हवा तसा. अहो, ती उडवील पुष्कळ ! पण बाप उडवूं द्यायला हवाना ! तो कसला खंबीर, पैनूपैचा हिशेब ठेवतो. कधीं नाटक-सिनेमाला चला म्हणून आग्रह केला आणि चुकून स्वारी झालीच कधीं तयार, तर माझ्या तिकिटाचे पैसे तर नाहींच देत पण आपल्याहि तिकिटाचे पैसे मलाच द्यायला लावतात. नाहीं तर म्हणतात “ नेलंस कशाला मला ! ” फार कशाला ? एखाद दिवशीं आपण होऊनच दारावर चार पैशांचीं करवंदें घेतलीं विकत तरीसुद्धां माझ्या मिळकतींतून ते पैसे कापून घेतात. खोटें

वाटेल लोकांना, पण खरें आहे अगदीं. हजारों रुपयांवर लाथ मारून लोकहिताकरितां ते फर्ग्यूसन कॉलेजमध्यें ७५ रुपयांवर वीस वर्षे नोकरी करतील. पण आपणच दारावर विकत घेतलेल्या चार पैशांच्या करवंदांचे पैसे माझ्यावर घरखर्च म्हणून आकारतील. तेव्हां साहजिकच दिल्लीला जातांना आप्पांनीं मला आणखी पैसे हवेत का, असें विचारलें; तेव्हां मला अतिशय आश्चर्य वाटलें. " तुला पैसे नकोच असतील ? जातांना दिले होते त्यांतले आहेतचना बहुतेक शिल्लक ? " असेंच कांहींतरी विचारतील अशी मला धागधूग वाटत होती. कारण शिल्लक नव्हतेच फारसे राहिलेले. आगगाडीच्या तिकिटाव्यतिरिक्त जरी बहुतेक प्रवास फुकटच झाला होता, तरी खरेदी केली होतीना पुष्कळ ! जशी बडदास्त ठेवली होती लोकांनीं त्या तोलाचीच आम्हीं ठिकठिकाणीं खरेदीहि केली होती. कारण आम्हांला सगळीं सोंगें करतां येतात; बादशाही थाटहि दाखवतां येतो; शेतकऱ्याच्या झोंपडींतहि राहतां येतें. गोल नेसून सिनेमानटीप्रमाणें मिरवतां येतें, लुगडें-चोळी नेसून कथापुराणालाहि जातां येतें, समाजस्वास्थ्य वाचतां येतें, वाल्मीकिरामायणहि लावतां येतें. असो.

मला आप्पांनीं जातांना अधिक पैसे देऊं केले खरे, पण मला त्याचा फायदा घेववेना. थोडे-थोडेके नाहीं, चांगले हजार-बाराशें रुपये त्यांनीं मला उसने दिले होते त्याची आठवण त्यांना दिल्यावांचून मला राहवेना. लहानपणापासून प्रामाणिकपणाचें बाळकडू पाजलें असलें म्हणजे अशी कुचंबणा होते. आपण होऊन घरीं चालत आलेल्या लक्ष्मीची 'बाई, तूं वाट चुकलीस' असें सांगून बोळवण करण्याची पाळी येते. त्याप्रमाणेंच मीं आप्पांनीं दिलेल्या रकमेंतलीच कांहीं रक्कम कर्जफेड म्हणून परत देऊं केली तों काय आश्चर्य ! " ते पैसे नकोत आतां परत करायला " असे शब्द माझ्या कानीं आले. आप्पांना तापबीप तर नाहींना आला ? मीं चटकन्

त्यांच्या पोटाला हात लावून पाहिला. नाहीं, ताप नाहीं. मग हें आहे तरी काय ? मलाच स्वप्न पडत असेल कदाचित् ! चिमटा घेऊन पाहिला. नाहीं, स्वप्नहि नाहीं ! मग सूर्य आज उगवला तरी कुठल्या दिशेला ! " सर " झाल्यावर आमचे आप्पासाहेब बदलले तर नाहींतना ? होय. असेंच असलें पाहिजे. नाहीं तर एवढ्या मोठ्या रकमेमर ते सहजासहजी पाणी कसे सोडते ? झाल्या गोष्टीचें मला राहून राहून आश्चर्य वाटे. घरांतल्या घरांत आप्पा इतके उदार होऊं शकतात तर ? उगीचच मी त्यांना भटजी भटजी म्हणून इतके दिवस टोचीत आलें. आतां फिरून नाहीं असें करणार. त्यांनीं आपल्याला इतका उदारपणा दाखवला, तर आपणहि आतां आपली कृत-ज्ञताबुद्धि व्यक्त केली पाहिजे.

काय करावें बरें ? कांहीं तरी विशेष केलें पाहिजे. पुढल्याच महिन्यांत त्यांचा वाढदिवस आहे. त्याच निमितानें आपण त्यांना चकित करून सोडावें. काय देतां येईल त्यांना ? घड्याळ ? छेः ! आहेत त्यांच्याजवळ. सोन्याच्या गुंड्या ? नाहीं. त्यांना तसला नखरा मुळींच आवडत नाहीं. पुस्तकें ? नको. आपण होऊनच सदान्कदा घेत असतात ते खंडीभर. मग काय द्यावें बुवा ? किती कठिण असतें पुरुषांना बक्षिस देणें ! हेंच आमचें बायकांचें पाहा ! कधीं लागेल का डोकें खाजवावें आम्हांला काय द्यावें म्हणून. जी गोष्ट बाजारांत दिसेल ती आम्हांला हवीच असते. कवडीची असो, नाहीं तर हजारांची असो. पण आतां या सरसाहेबांना द्यावें तरी काय ?

काय कमी आहे यांना ? अरे हो ! मोठेंच कमी आहे कीं ! वाहन कमी आहेना सरसाहेबांना ! इतका कसा वेळ लागला हें सुचायला ? तरी बरें, सगळींजणें " आप्पांना मोटार घ्यायला लाव " म्हणून मला सारखी पढवीत

असतात. पण आपण मोटार मात्र नाहीं घेणार. कसलें भिकार वाहन तें ! उघड्या मोटारींतून जावें तर वारा लागतो. बंद मोटारींत जावें तर मळमळतें. शिवाय मोटारींत ऐश्वर्य नाहीं कीं सुख नाहीं. राजे-राजवाडे सुद्धां खास दरबारच्या प्रसंगीं मोटारींतून मिरवतात का कधीं ? सुंदर घोड्याची गाडीच काढतात बाहेर ! आपणहि घोड्याचीच गोडी ठेवणार. टुकुक्कू, टुकुक्कू करीत ऐटींत घोडा उडवीत जाणार. घोड्यासारखें उमदे जनावर नाहीं दुनियेंत. बस्स ठरलें. गाडीच्या तयारीला लागायचें.

खरेंच आमची जुनी गाडी होती कीं, आज सतरा वर्षांनीं तिची आठवण झाली ! खरें प्रेम असेंच असतें. घड्याळाप्रमाणें दर क्षणागणिक जप नाहीं करीत बसत. योग्य वेळ आल्यावरच तें जागृत होतें ! आजीजवळ त्या गाडीची चौकशी केली. " पाठीमागल्या तबेल्यांत तें धूड पडलें असेल कुठें तरी " अशी माहिती मिळाली. धावत धावत तबेल्याजवळ गेलें, तर कुलूप. लगेच किल्ली पाहिजे म्हणून हाकाटी केली. पण किल्ली लवकर सांपडली तर ती आजी कसची ? मी जों जों जास्त घाई करूं लागलें तों तों किल्ली जास्तच हरवूं लागली. अर्ध्या-पाऊण तासानें सांपडली एकदाची. तबेला उघडून आंत गेलें तों चहूंकडे कोळिष्टकांच्या तोरणांनीं गाडी अगदीं मढून गेली होती. शिवाय धुळीनेंहि आपला हात सगळीकडे फिरविला होता. अशा स्थितीत गाडीचें दर्शन होणार तरी कसें ? गड्याला गाडी साफसूफ करायला सांगितली. पाहतें तों गाडीच्या सांगाड्याखेरीज जवळ जवळ कांहींच शिल्लक नव्हतें. कसें राहणार ? सतरा वर्षांत जर कोणी तिच्याकडे ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं, तर तिनें बिचारीनें तरी काय करावें ? आतां ही गाडी नीट करण्यांत कांहीं फायदा आहे का ? कोणाला विचारावें ? नात्या-पैकी कोणाला सांगायचें नव्हतें. कारण हें होतें आमचें गुपित. तेव्हां आतां कोण आपल्याला सरळ मार्ग दाखवील ? हं ! आमचे डॉक्टर ! त्यांनींच

मला एकदां "तुम्ही घोडयाची गाडी कां ठेवीत नाहीं" असें विचारलें होतें ! तेव्हां आतां त्यांच्याच बोकांडीं बसायचें !

अर्ध्या तासांत दवाखान्यांत येऊन ठेपलें. दारांत एक गृहस्थ भेटले "कां, कोण आजारी आहे ?" म्हणून त्यांनीं पृच्छा केली. "गाडी आजारी आहे" असें उत्तर पटकन् तोंडून निसटलें. "गाडीचें औषधहि इथेंच मिळतें का ?" असा उलट प्रश्न येतांच 'हो' म्हणून वर्तमानपत्रांत डोकें खुपसलें. कारण गाडीचें गुपित फोडायचें नव्हतें. तेव्हां आपलें गप्पच बसलेलें बरें. कारण मी एकदां का बडबडायला लागलें कीं, पोटांत कांहींच राहायचें नाहीं. हें आमचें आम्हांला माहीत. डॉक्टरांना फुरसत मिळाल्यावर माझी योजना त्यांच्यापुढें मांडली. माझ्यापेक्षां त्यांनाच अधिक आनंद झाल्यासारखा दिसला. जणुं काय त्यांनाच मी गाडी बक्षिस देणार होतें. "ठीक आहे. गाडी पाहायला माणूस पाठवतों" असें आश्वासन मिळाल्यावर मी तेथून निघालें. व दोनतीन कामें उरकून मामीकडे जेवून घरीं येतें तों गाडीचा एक कारखानदार घरी येऊन ठेपलेला. आमचेच डॉक्टर आहेत ते. एकदां एक काम करतों म्हणाले कीं, मग त्याला उशीर नाहीं लागायचा. जेवण तरी जेवले कीं नाहीं बिचारे कोणास ठाऊक. कारखानदाराला गाडी दाखविली. मागूनपुढून खालूनवरून गाडी त्यानें नीट न्याहाळली.

"बरींच वर्षे गाडी बाहेर नाहीं काढलेली दिसत" तो म्हणाला.

"नाहींना; सतरा वर्षे बसून आहे बिचारी."

"गाडी पण गाडी आहे बाईसाहेब. असा उत्तम माल आतां पैसे टाकून पर मिळायचा नाहीं."

हा माणूस माझी चेष्टा तर करीत नाहींना ! कोण भूत दिसतं आहे त्या गाडीचें आणि हा म्हणतो उत्तम माल आहे.

" बाई, तांबडं घोडं होतं आपलं, नव्ह का ? "

घोडीं बहुधा तांबडींच असतात. दिलें असेल ठोकून झालें, असा विचार करीत मी म्हणालें,

" हो हो, तांबडंच होतं, मस्ती करीत असे भारी. "

" अगदीं बराबर, एकदा तर रिकामी गाडी घेऊनच पळालं होतं, नाहीं, बाईसाहेब ? "

" अरे वा ! तुम्हांला तर सगळी माहिती दिसते. "

" गाडी आमच्याच कारखान्यांत नसे का नीट करायला येत ? तवा न्हान् व्हतां तुमी, या धाकल्या बाईएवढ्या. "

असें म्हणून त्यानें सईकडे प्रेमानें पाहिलें.

" मग ही गाडी तुम्हांला माहीत आहे तर ? "

" हें काय सांगायला पाहिजे, ताईसाहेब ? "

बाईसाहेबांच्या ताईसाहेब झाल्या हें पाहून जरा गंमत वाटते, तोंच आमचा जुना कारखानदार पुढें म्हणतो,

" पोटच्या पोरावानी या गाडीचे कष्ट काढले आहेत. आतां नाही दिसायचा असा माल. होतच नाहीं तर दिसेल कुठून ? "

" मग ही गाडी दुरुस्त होईल म्हणतां ? " मीं विचारलें.

" अन् ती कां नाहीं होणार ? अगदीं फष्ट क्लास होईल पगा, नवी का जुनी कळणार पर नाहीं कुणाला. "

" काय खर्च येईल सगळं करायला ? "

" सगळं नवं घातलं पाहिजे, ताईसाहेब. टप सगळा कामांतून गेलाय. गाद्या पार खराब झाल्यात. "

" तें तर दिसतंच आहे. मग काय पडेल सगळं करायला ! "

" धांवा नवीन घालायला हव्यात. एक पोळ पर खाल्ला आहे कसरीनं. "

" तें सगळं तुमचं तुम्ही बघा. एकंदर काय खर्च येईल तेवढं सांगा म्हणजे झालं."

नक्की आंकडा सांगायला तो काचकूच करीत होता. पण मीं सारखा लकडा लावला, तेव्हां सांगितलान् एकदाचा.

घासघीस तर मला करतांच येत नाहीं. त्यांतून माझ्या गुडघ्याला बांधलें होतें बाशिंग. तेव्हां जेमतेम "डॉक्टर सांगतील ती रक्कम देईन" असें सांगून गाडी नव्या सारखी दिसली पाहिजे असें बजावलें.

" त्याची नको काळजी. नव्यापेक्षां सुंदर होईल बगा. पण ताईसाहेब, घोडा आहे का घेतलेला ?" त्यानें विचारिलें.

" नाहीं. तुम्ही पाहून ठेवा एखादा. पांढरा पाहिजे बरं का; नाहीं तर एकदम काळा" मीं उत्तर केलें.

" बाई गाडीला रंग कसला द्यायचा ?"

" बरी आठवण केलीत. काळा रंग द्यायचा अगदीं काळाकुळीत, व कडेला सोनेरी रेघ पाहिजे. पाठीमागें तुम्हांला एक छाप देईन तो सोनेरी छापांत छापला पाहिजे, समजलं ? सगळं अगदीं उत्तम झालं पाहिजे बरं का."

" तें मात्र अगदीं नक्की."

असें म्हणत तो गाडी तर घेऊन गेला, व माझ्या डोक्यांत विचार सुरू झाले.

आतां लवकरच आपल्या मालकीच्या बगींतून हिंडतां येईल. मुंबईच्या भाड्याच्या बगीवर तहान नको भागवायला. गाडी नीट करून आली कीं घोडा पाहायला लागायचें. देवानें दुनियेंत दोनच देखणे प्राणी निर्माण केले आहेत. पहिलें मांजर व दुसरा घोडा. मांजरे तर आहेतच हवीं तितकीं, आतां घोडा येणार. मला लहानपणापासून घोड्याचें प्रेम फार. पुण्याचे

टांगेवालेसुद्धां सांगतील. “ ती बया भाड्याची किरकीर नाहीं करायची. दोन आणे जास्त देईल, पर घोड्याला उलीसा पर चाबूक नाहीं लावूं द्यायची. ” म्हणूनच कित्येक टांगेवाले माझी गिन्हाइकीसुद्धां नाकारतात. “ बाई, तुमच्या मनास नाहीं ग्यायचं आमचं जनावर. तुमी पगा दुसरा टांगा. ” बाकी घोडें चाबकाशिवाय चालेल कीं नाहीं हें त्याच्याच पृष्ठभागाकडे पाहिलें कीं ताबडतोब समजतें. ढुंगण वाटोळें असेल तर घोडें मारखाऊ नसतें हा माझा सिद्धांत, व त्याबरहुकूम घोडें पाहूनच मी नेहमीं टांग्यांत पाय ठेवतें.

एकदां माझी अशी सोळा आणे फजिती झाली कीं कांहीं विचारूं नका. मला एका ठिकाणीं बारशाला जायचें होतें. म्हणून रविवारांत जाऊन चांदीचा खुळखुळा घेतला, गजानन स्टोअर्समध्यें बनारसी खण घेतला, व सेवासदनमध्यें लोकरीचा सुंदर बाळंतविडा घेतला. हें सगळें होतां होतां उशीर झाला म्हणून टांगा करायचें ठरविलें. मनांत विचार येतो तोंच एक टांगा येऊन थांबला. घोडें सुंदर व वाटोळें होतें. पाठीवर तीन घंटा होत्या. कानांवर फुलें होतीं. डोक्यावर पिसांचा तुरा होता. गळ्यांत मण्यांच्या माळा होत्या. मी अगदीं खूष झालें. टांगेवाला बराच हौशी दिसतो वरें का, असें म्हणत मीं टांग्यांत पाय ठेविला. तितक्यांत माझा मामा येतांना दिसला. त्यालाहि जिमखान्याकडे जायचें होतें. तेव्हां त्यालाहि बसवून घेतला व टांगा पुढें चालूं लागला. पुढें कसला, मागेंच चालू झाला म्हणाना. घोडें पुढें जाईचना. मागें सरकूं लागलें. चार शिव्या हासडून टांगेवाल्यानें बदाबदा चाबूक हाणले तेव्हां कोठें रडत-खडत घोडोजीराव चालूं लागले. चाबकाचा प्रयोग सारखा चालूच होता, व मी “ मारूं नको, मारूं नको ” म्हणून सारखी ओरडतच होतें. तो माझ्या ओरडण्याकडे अगदींच लक्ष देत नाहीं असें पाहून मीं त्याच्या हातांतला चाबूक हिसकावून घेतला. घोडोबा अधिकच हळू चालूं लागले. मामाला

जिमखान्यांत त्याच्या घरीं सोडला, व मी एकदाची घरीं आलें. सहा आणे त्याच्या हातावर ठेवूं लागलें. ही लढाईपूर्वीची गोष्ट बरें का. त्या वेळीं खरें म्हणजे सेवासदनापासून घरीं यायला आप्पा चारच आणे देत असत, पण मी पडलें बडे बापकी बेटी ! म्हणून मी सहा आणें देऊं केले. पण टांगेवाला लागला तक्रार करायला.

" दोन भाडीं केलीं आणि एवढ्या पैशांत कसं भागेल ? "

" दोन भाडीं ? दोन भाडीं कुणाचीं "

" त्या साहेबांना जिमखान्यांत नाहीं का सोडलं ? "

" वा रे वा. जिमखान्यांत सोडलं म्हणे ! पन्नास पावलांचा तरी वळसा पडला का तुझ्या घोडयाला ? दोन भाडीं म्हणतोस तो ? आणि घोडं तरी कसलं रडुबाई आहे. दिले हेच जास्त समज. "

" मग पहिल्यानंच असं कां नाहीं सांगितलं ? मीं भाडंच घेतलं नसतं, तुमचं. म्होटं गिऱ्हाईक वाटलं म्हणून सौदा नाहीं क्येला. पगावं तर असलं फुकट गिऱ्हाईक. " तो जरा जास्त उर्मटपणें बोलूं लागला.

" हं. तोंड आंवर. चल घे हे पैसे अन् चालूं लाग मुकाटयानं. "

" काय जाळायचं हाय त्या पैशांना. "

तो मोठमोठ्यानें भांडूं लागला. भोवताली राहणारी मंडळी आपापल्या खिडक्या-दारांतून गोळा होऊं लागली.

" ओरड वाटेल तितका. तुला काय वाटलं, रस्त्यावर गर्दी जमली म्हणजे मी मऊ येईन होय ? बोल, घेतोस कीं नाहीं पैसे ? "

" काय भीक लागलीय ते पैसे घ्यायला ! "

" ठीक आहे, तुला एवढी मिजास आली असेल तर नको घेऊंस. " असें म्हणत मीहि ते पैसे पिशवींत टाकले, खालीं उतरलें नि चालूं लागलें.

" तुम्ही परत येईस्तोपर मी हितंच बसून राहीन."

" वाट बघ मी येतें परत ! आतां हे सहा आणे सुद्धां खटला करून वसूल करावे लागतील, समजलास?"

असा जोरांत दम भरून मागच्या दारानें मी घरांत आलें, व हळूच पुढच्या दारीं जाऊन तो गेला कीं नाहीं तें पाहूं लागलें. पण मेल्यानें पुढल्या दाराची घंटा वाजविली कीं ! आणि म्हणाला,

" बाई, पैसे टाका भाड्याचे."

" आतां भाड्याचे पैसे तर नाहींतच, पण तुझा नंबर ठेवतें टिपून आणि करतें तक्रार पोलिसांत." असें म्हणून टांग्याचा नंबर पाहून घेतला.

तोहि कांहीं कमी नव्हता. तो लगेच म्हणतो,

" अन् तुमचं पर नांव सांगा कीं."

मीं माझें नांव सांगितलें व त्याचें नांव विचारलें तेव्हां तो आपला बिल्ला पुढें करून म्हणाला,

" वाचा कीं नांव. येतं का नाहीं वाचतां ?"

" नाहीं, शिकायला येणार आहे तुझ्याकडे. नुसता नंबर लिहिला आहे या बिल्लयावर. आंकडे आणि अक्षरं यांतला फरक तरी कळतो का तुला. चल सांग आतां आपलं नांव."

" माझं नांव कशाला ? मालकाचं सांगतों माझ्या ?"

" सांग, मालकाचं सांग म्हणजे सांगतें जाऊन त्याला तुझा डांबिसपणा."

त्यानें एक कानडी नांव सांगितलें व पुष्कळ बडबड करीत निघून गेला. मीं वर येऊन तें नांव व तो नंबर टिपून ठेवला. अशी चीड आली होती !

कांहीं वेळानें आप्पा घरीं आले. त्यांना सगळी हकीकत सांगितली व आतां काय होईल असें विचारलें. " कांहीं होणार नाहीं. मालक आला

तर सहा आणे देऊन टाक" असें त्यांनीं सांगितलें. त्या दिवशीं मालक आला नाहीं, दुसऱ्या दिवशीं पण आला नाहीं. मला माझी शाबास वाटत होती. काय मेला उर्मट तरी! त्याला वाटलें, बाई-माणूस आहे, केला जरा गोंगाट कीं, सोडील मूठ सैल. बस म्हणावें आतां हरि हरि करीत. तेवढ्या दीड दिवसांत दहा माणसांजवळ तरी मीं माझें कौतुक केलें असेल. तिसऱ्या दिवशीं बारशाला जायचें होतें. मला बाळंतविड्याची आठवण झाली. पेटींत पाहिला तेथें नव्हता. कपाटांत पाहिला तेथेंहि नव्हता. कुठें बरें ठेवला घरीं आल्यावर? पण घरांत आणलाच कधीं? हरि विठ्ठल! टांग्यांतच राहिला कीं तो! वा! छान!! आमचीच झाली म्हणावयाची. त्याचा नांव नंबर होता टिपलेला. पण आतां नको रे बाबा त्याच्याकडे जायला. आणखी आमचीच शोभा व्हायची. सहा आणे मिळविले म्हणून दीड दिवस नाचलें. आतां बाळंतविड्याचे नऊ दहा रुपये गेले म्हणून जन्मभर रडत बसेन. दुसरा बाळंतविडा घ्यायलाहि वेळ नव्हता. शिवाय फिरून टांग्यांत विसरलें तर काय घ्या. तेव्हां बाळाच्या हातांत एक नोट ठेवली आणि बसलें मूग गिळून. पैसे गेल्याचें दुःख फार नाहीं, पण माझी काय किंमत केली असेल त्या टांगेवाल्यानें?

पुष्कळ टांगेवाले माझे मित्र असले तरी एकंदरींत अनोळखी टांगेवाल्यांच्या व माझ्या झटापटी नेहमींच होत असतात. आणि प्रत्येक वेळीं मीच हरतें असें मात्र नाहीं. एकदां सकाळीं माझ्या येथें श्री. गजाननबोवांचें गाणें होतें. गाणें उत्तम झालें व साडेबाराच्या सुमारास श्री. मिराशीबोवांना गाण्याचा आग्रह करण्यांत आला. दोन्ही गवई फारच सज्जन. नाहीं तर अशा वेळीं मानापमानाचा ऊत यावयाचा. दोघांनीं बरोबर गावें अशी सर्वांची इच्छा होती, आणि दोन्ही गवई-सज्जनांनीं ती पुरी करण्याचें मनावर घेतलें. गाणें असें रंगलें कीं, श्रोतृसमाज भूकतहान खरोखरच विसरून गेला. कारण

दुपारचे बारा केव्हांच वाजून गेले होते. गाणें कसलें तें! नुसती झुंजच लागली होती दोघांची. दोन केव्हां वाजले तें समजलें सुद्धां नाहीं. श्री. र. धों. कर्वे या गाण्याकरितां मुद्दाम मुंबईहून आले होते. त्यांना साडे-तीनच्या गाडीनें परत जायचें होतें. गाणें संपल्यावर दोन घांस त्यांच्या घशाखालीं जेमतेम उतरविले व टांगा आणावयास गणपतला सायकलवरून पाठवला. पुण्याच्या स्टेशनकरतां ठरवून आण असेंहि बजावलें. आम्ही सामान घेऊन फाटकाशींच उभे राहिलों. थोड्या वेळानें गणपत सायकलवरून आला व टांगा बराच मागून रडतखडत येत होता. रुपया ठरवल्याचें सांगून गणपत खालीं उतरला तों तो टांगा वाटेंतच थांबला व एका तिऱ्हाईत इसमाला घेऊन परत फिरला. आम्ही "टांगा, टांगा" म्हणून ओरडतच होतों तरी तो परत फिरेना.

इथे कांहीं तरी दगा आहे असें ताडून मीं टांग्यामागें धूम टोकली. टांगा सुमारें पांचशें फुटांवर होता. तरीपण पळत जाऊन चालू टांग्याला गांठणें जरा कठिणच समजलें पाहिजे. पण घोडोबाचा दम होता शिळा, आणि आमचा होता ताजा. शिवाय त्या वेळीं आमचे डॉक्टरमहाशय आमच्या एका तक्रारीवर औषध म्हणून आम्हांला रोज सकाळीं धांवायला लावीत असत. तें औषध आतां उपयोगी पडलें आणि एका दमांत आम्हीं टांगा तर गांठला. पण तो काय तोंडच्या शब्दानें थांबणार होता थोडाच. अशा वेळीं हाताची करामत पाहिजे होती. मी जरा जास्त जोरानें धांवून घोड्यासमोर जाऊन उभी राहिलें व त्याची कांटेसुतळ धरली हातीं. कांटेसुतळ धरली कीं घोडा आपल्या ताब्यांत येतो हें मला माहीत होतें. झालें. टांगेवाल्याची व माझी बाचाबाची सुरू झाली.

"बाई घोडं सोडा."

" आतां घोडं सोडतें बघ. माझ्या माणसानें तुला ठरवून आणला आणि तूं चाललास कोठें ? "

मी घोडें वळवूं लागलें.

" बाई, टांगा मोडल, सोडा घोडं. "

" मोडेल तर छान होईल, तुला चांगली अद्दल घडेल. एक गिऱ्हाईक ठरवलं असतां वाटेंतच दुसरें घेतोस काय ? "

" मोठ्या स्टेशनवर आज टांगा नाहीं जायचा, ताबूत आहेत आज. "

" ताबूत आहेत संध्याकाळीं चारच्या पुढें. आणि तुला आतां कळलें का ताबूत आहेत तें ? रुपायाचें भाडें ठरवलेंस तेव्हां काय झोंपला होतास ? "

" रुपयांत मोठ्या स्टेशनवर कोण जाईल ? शिवाजीनगरचा ठरला होता रुपया. "

" म्हणून टांगा फिरवून दुसरंच गिऱ्हाईक घेऊन चालला होतास होय ?"

आमचा हा प्रेम-संवाद ऐकून त्याचें नवें गिऱ्हाईक आपली पेटी घेऊन खालीं उतरलें. नेहमीप्रमाणें शेजारची मंडळी गंमत पाहत घराबाहेर उभी होती. घोडयाचें मुस्कट धरून मी जबरदस्तीनें त्याला वळवीत होतें.

" शिवाजीनगरचा रुपया घेईन " टांगेवाला म्हणाला.

" माझ्या माणसानें पुण्याच्या स्टेशनचा रुपया ठरवला आहे. "

" विचारून या त्याला. "

" तर तर. म्हणजे मी त्याला विचारून येईपर्यंत तूं पसार व्हावास. काय बोळ्यानें दूध पितें असं वाटलं होय तुला ? तूंच चल आतां तिकडे. "

" चला तर मग. गिऱ्हाईक काय वडावरून उतरलें आहे का पिंपळावरून. "

असें पुटपुटत त्यानें मी टांग्यांत बसायच्या आधींच घोडा जोरानें पुढें

काढला. पण मी काय कमी होतें ! लगेच धांव मारून पटकन् त्या चालत्या टांग्यांत मी चढलेंसुद्धां. टांगा दाराशीं थांबतांच गणपतनें मोठ्या स्टेशनचाच रुपया ठरवल्याचें फिरून एकवार सांगितलें.

" मोठ्या स्टेशनचा न्हाई. शिवाजीनगरचा रुपया सांगितला मीं. खोटं बोलतोस तूं. "

लगेच आमची स्वारी आमच्या गड्याच्या संरक्षणार्थ धांवून आली.

" आपल्यावरून जगाची परीक्षा करूं नकोस. माझा गडी खोटं बोलत नाहीं कधीं. पांच वर्षे आहे तो माझ्याकडे. "

" बरं, बसा आतां बेगिन्. माझा आणखी वेळ नका दवडूं फुकट " तो म्हणाला.

" तुझा वेळ ना ? नाहीं आतां फुकट दवडीत. बरं किती वाजले रे गणपत ? "

डोक्यांत एकदम एक कल्पना येऊन मीं विचारलें. तीन वाजले असें कळतांच गणपतला कर्न्याची पेटी डोक्यावर घ्यायला सांगितली व म्हणालें,

" तीनच वाजलेना ? गाडी शिवाजीनगरला ३-४० वाजतां येते. चला आपण चालतच जाऊं, म्हणजे या टांगेवाल्याचा वेळ नको फुकट दवडायला. " असें म्हणून आम्ही तिघें चालूं लागलों.

" बाई टांगा ठरवला त्याचें काय ? " त्यानें जरा चकित होऊन विचारलें.

" त्याचं काय असायचं ? वाटेंत दुसरें गिऱ्हाईक घेऊन पळून जात होतास तेव्हां कुठें नाहीं हा विचार आला तुझ्या डोक्यांत ? जा आतां. तें गिऱ्हाईक तर गेलंच तुझं, आतां हेंहि चाललं. तूं एक हलकट तर मी दहा हलकट. समजलास. जा आतां कर माझ्या पंचवीस पिढ्यांचा उद्धार, " असें म्हणून आम्ही तिघें शिवाजीनगरला चालतच गेलों.

गाडी नीट करायला टाकून पंधरा दिवस झाले, तिचा कायाकल्प कोठवर आला आहे तें पाहण्यासाठीं एक दिवस मी कारखान्यांत गेलें, तर गाडीला कोणी हातसुद्धां लावला नव्हता. नीट करायला म्हणून जें खोकें घरांतून नेलें होतें तें जसेंच्या तसेंच अजूनपर्यंत पडून होतें. कपाळाला थोड्याशा आठ्या घालूनच मीं कारखानदाराकडे पाहिलें; तर कालच सुताराचा एकुलता एक मुलगा मेल्याचें वर्तमान मला त्यानें अगदीं डोळ्यांत पाणी आणून सांगितलें. तें सर्व मला थोतांडच वाटतच होतें; पण उलटपक्षी असें वाटें कीं, कादंबऱ्या बोलपटांतून तेवढे, गरिबावर ओढवलेले असले प्रसंग आपण डोळ्यांत पाणी आणून पहातों व त्यांवर थोतांड हा शिक्का मारणाऱ्या धनिक लोकांचा द्वेष करितों; तेव्हां आतां प्रत्यक्षच वेळ येऊन ठेपल्यावर एकदम हें वर्तमान खोटें तरी कसें ठरवावें ? गरिबांना सुद्धां एकुलता एक मुलगा असणें अशक्य नाहीं, आणि तो मरणेंहि अशक्य नाहीं. जाऊं दे, आपण आपलें माघारीच जावें हें उत्तम ! ही नसती भवति न भवति हवी कशाला ?

फिरून आठ दिवसांनीं कारखान्यावर फेरी मारली; तरीहि गाडी आपली होती तिथेंच. आतां मात्र मी रागावलें. " आज कोण मेलं सुताराचं ? " असें मीं विचारतांच, " बाई, त्याच दुखण्यानें आज बायको गमावली त्याची " असें उत्तर आलें. वा ! हें फार झालें. आतां बोलपट-कादंबऱ्यांना मनांत थारा देऊन उपयोगी नाहीं. सत्य-सृष्टींत कुठें घडतें का असें ? परवां म्हणे एकुलता एक मुलगा मेला. आज बायको मेली. उद्यां तो मरेल ! संकटांची परंपरा वाङ्मयसृष्टींत ठीक आहे. पण खरोखरीच जर अशा गोष्टी घडूं लागल्या तर माझी गाडी नीट तरी कशी व्हायची ? परवा मी आपली गप्प बसलें तर हा माणूस फारच बाता मारायला लागला. " तें कांहीं नाहीं, आठ दिवसांनीं जर गाडी अशीच दिसली तर मी दुसरा कारखानदार पाहीन " असें बजावून मी गेलें.

चारच दिवसांनीं कारखानदार पैसे मागायला आला. “ गाडी झाली इतक्यांत नीट ? ” मीं टाळ्या पिटीत विचारलें. “ छे छे बाई ? इतक्यांत कशी होईल नीट ! ” त्यानें हंसूं दाबीत उत्तर दिलें. “ मग पैसे कशाला हवेत ! ” मला साहजिकच प्रश्न पडला. माल घेऊन पैसे द्यावयाचे एवढेंच आम्हांला माहीत. “ बाई गाडी करायला घेतली आतां. नवं लाकूड हवं. चामडं पर लागेल थोडंफार. लोखंडहि पाहिजे. पैशाशिवाय कसं जमायचं सारं ? ” त्यानें मला समजावून सांगितलें, व मीं “ किती पाहिजेत ? ” असें विचारलें. सरळ आंकडा सांगायचा त्याचा स्वभावच नव्हता. तो बसला प्रत्येक गोष्टीचा हिशेब करीत. मला पाहिजे रोखठोक उत्तर. शेवटीं एकदां त्यानें “ सध्या दीडशें तरी द्या, ” असें म्हटलें. आप्पा नसतांना एवढे पैसे घरांत कुठले असायला ? शिवाय त्याला एकदम पैसे देणें बरोबर आहे का असा विचार मनांत येऊन डॉक्टरांची आठवण झाली व दुसऱ्या दिवशीं त्याला त्यांची चिठ्ठी घेऊन यायला सांगितलें. माझ्या सावधगिरीची मलाच शाबास वाटली. नाहीं तर आम्ही आपल्या पटकन् पैसे देऊन बसायच्या. आतां आपण संध्याकाळीं दवाखान्यावर जाऊन डॉक्टरांना विचारून ते सांगतील तसें करावें असा विचार केला. पण दुसरा दिवस तो उजाडूं देतो कशाला ? लगेच दोन तासांत तो डॉक्टरांची चिठ्ठी घेऊन आला सुद्धां. पैसे घेण्याच्या वेळीं या लोकांच्या घरीं सर्व मंडळी कशी सुखरूप असतात. मग मुलगा मरत नाहीं, बायको आजारी पडत नाहीं, कांहीं नाहीं. डॉक्टरांनीं शंभर रुपये द्यायला सांगितले होते ते बँकेंतून आणून त्याला दिले व पावती लिहून घेतली.

पैसे नेले आहेत तेव्हां गाडी आतां लवकरच हातीं येईल अशी मनांची गोड समजूत करून घेतली व गाडींतून मिरवण्याचीं मनोराज्यें करीत बसलें. आतां पंधरा दिवसांनीं आप्पा येतील. आपण गाडी घेऊनच त्यांना स्टेशन-

वर आणायला जाऊं. त्यांना किती आनंद वाटेल. ते आपल्याला कशी शाबासकी देतील. आपण ऐटींत घरीं येऊं. सई वर गाडीवानाजवळ बसेल. आप्पा व मी मागें बसूं. एक ना दोन, हजार सुखस्वप्नें पाहून घेतलीं. पण आप्पा आपले कांहीं न सांगतां–सवरतां दहा दिवस आधींच उगवले. काय करावें यांना ? अरसिकपणा जसा या परांजप्यांच्या पांचवीला पुजला आहे, असें पुटपुटत मीं त्यांचें सामान उतरवून घेतलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आप्पा व मी बागेंत फिरत असतां कारखानदार नेमका उगवला. आत्तांच फावलें मेल्याला यायला. मी त्याला हळूंच मागल्या दारीं घेऊन जाणार होतें, पण जायच्या आधींच तो म्हणाला,

" गाडी सगळी उतरली आहे आतां. एकदां बघून जा. "

आप्पांचे कान कांहीं बंद नव्हते.

" गाडी, कसली ग गाडी ? कुणाची गाडी ? कुठली ग गाडी ? "

आप्पांच्या प्रश्नांची सरबत्ती सुरू झाली. सगळें पुराण समजेपर्यंत का आतां ते मला चैन पडूं देणार आहेत ! आणि मी मारे ' गुपित गुपित ' म्हणून सर्व कारभार अगदीं चुपचाप चालवीत होतें. संध्याकाळीं येतें असें सांगून कारखानदाराला वाटेला लावला व आप्पांकडे वळून मी म्हणालें,

" तुम्हांला मी इतक्यांत सांगणार नव्हतें आप्पा, सगळें झाल्यावर चकित करून सोडणार होतें. मीं आपली जुनी गाडी नीट करायला टाकली आहे. "

" ती कशाला ? " आप्पा कपाळाला आठ्या घालीत म्हणाले.

" आपल्याला, घरीं कामाला. पूर्वीं होती तशी. "

" पैसे कुठून आणणार हीं सगळीं सोंगें करायला ? "

" गाडी नीट करायचे व घोडयाचे पैसे मी देईन. "

" आणि दर महिन्याचा खर्च कोण देणार ? "

" तुम्ही. "

" छट, पैसे नाहींत माझ्याजवळ. "

" पण मागें तुम्हीं मोटार घ्यायची गोष्ट काढली होती. घोडागाडीला किती तरी कमी पैसे लागतील. "

" वा ! म्हणून काय झालं ? विचारलं कां नाहींस मला आधीं ! "

आतां काय सांगूं यांना कपाळ ! कसलीहि कुणकूण लागूं न देतां हळूंच प्रेमाची भेट देण्यांत जें काव्य असतें तें आतां यांना कसें समजावून सांगूं ?

" केव्हां टाकलीस गाडी नीट करायला ? " तपकिरीची चिमूट नाकांत कोंबीत त्यांनीं विचारलें.

" तुम्ही दिल्लीला गेल्याच्या चौथे दिवशीं. "

" काय खर्च येणार आहे ? "

" तें ठरलं नाहीं अजून नक्की. "

" म्हणजे अगदींच गाढव आहेस तूं. "

" हो, आहेना. " गाढवच नाहीं तर काय ? असल्या दक्ष माणसाला बक्षीस देऊन चकित करूं पाहणें म्हणजे गाढवपणाच नाहीं का ? बक्षीस यांच्यापुढें करावें तर " वा ! काय सुंदर आहे ! " असें म्हणण्याऐवजी ते नेमकी किंमत विचारणार.

" कांहीं खर्च आला तरी तो मी देईन. "

" पण हवी आहे कशाला गाडी ? "

" कशाला म्हणजे, तुम्हांला यायला–जायला. बशी–टांग्यांतून जाणं आतां शोभत नाहीं तुम्हांला. मोटार नाहीं तर निदान घोडागाडी तरी ठेवलीच पाहिजे तुम्हीं. "

" माझ्याजवळ पैसे नाहींत असले श्रीमंती चोचले करायला. "

" पैसे नाहींत ! पैसे नाहींत ! जन्मभर ऐकतें आहें हें रडगाणें. कॉलेज-

मध्यें होतां तेव्हांहि पैसे नाहींत. दिवाण झाला तरी पैसे नाहींत. अिंडिया कौन्सिलचे मेंबर होऊन विलायतला गेला तरी पैसे नाहींत. लखनौला कुलगुरु होता तरी पैसे नाहींत. नुसते भटजी आहांत तुम्ही. लोकांच्या मोटारींतून फुकट तेवढं जायाला हवं तुम्हांला. स्वतः खर्च करायला नको, नाहींतर काय? लोक हंसतात तुम्हांला तुमच्या पाठीमागें."

"हंसूं देत, मला चालतं."

"पण मला नाहींना चालत. मी ठेवणार गाडी."

"ठेव नि खर्च पण तूंच कर."

"कुठून करूं खर्च? मी काय मिळवतें आहे?"

"शिल्लक टाकतेस कीं महिन्याच्या महिन्याला. ठेवले आहेसना पैसे बँकेंत."

"ते आपले प्रवासखर्चाकरितां मी थोडे शिल्लक टाकतें."

"हवा आहे कशाला प्रवास करायला? घरीं काय होतं नीटपणीं राहायला?"

"आणि समजा, नाहीं केला प्रवास तरी तेवढ्या पैशांत गाडी-घोड्याचा खर्च थोडाच भागणार आहे? दिवसेंदिवस महागाई कोण वाढते आहे. आतां महिन्याला घरखर्चाला देतां तेच पैसे पुरेनासे होत आहेत."

"कमी कर खर्च."

"काय करतें हो मी खर्च? शालू नेसतें का पैठणी नेसतें? का हिऱ्यामोत्यांचे दागिने घालतें? रोज पंचपक्वान्नांचें जेवण जेवतें का दारू पितें, करतें तरी काय?"

आतां मात्र आमचें चंद्रबळ खलास झालें, व डोळे पाण्यानें भरून आले.

"रडायला काय झालं?"

"काय काय? इतकी साधेपणानें राहतें तरी तुम्हांला चीज नाहीं

कशाचं. अकरा वर्षे मीं विलायतेंत काढलीं आहेत हें खरं तरी वाटेल का कुणाला ? जें पडेल तें काम न कुरकुरतां करतें, तरी म्हणे खर्च कमी कर. परवा शेणाचे गोळेसुद्धां वळले मीं."

"पण मी कुठें नाहीं म्हणतों आहे ?"

गंगायमुनांचा पूर पाहून जरा घाबरूनच आप्पा म्हणाले.

"कुठून गेलें तुम्हांला वाढदिवसाचं बक्षीस द्यायला कुणास ठाऊक. जळ्ळी ती गाडी पडली असती जगाच्या अंतापर्यंत धूळ खात तर काय बिघडलं असतं ? कशाला टाकली मेली नीट करायला ?"

"विचारल्याशिवाय कशाला टाकलीस ?"

"शेण खाल्लं, झालं ? वाटलं, आपला बाप कधीं नव्हे तो उदार झाला आहे; गेलें त्याला चकीत करायला. चांगली अद्दल घडली. खाशी खोड मोडली. गाढवी, करशील का फिरून असं ? अं ? जाशील फिरून बापाला बक्षीस द्यायला ? तूंच घे हें बक्षीस."

असें म्हणत मी सपासप माझ्याच मुस्कटांत मारून घेऊं लागले. आप्पांनीं लगेच माझे हात धरले,

"हें काय हें वेडयासारखं. उगीच का डोक्यांत धुरी घालतेस ?"

"तुम्हांला काय त्याचं ? तुम्ही तर कवडीसुद्धां सोडणार नाहींना ?"

"नाहींत पैसे तर देऊं कुठून ?"

"ठीक आहे. नका देऊं. मी माझ्या पोरीचं दूध तोडीन, पण गाडी ठेवून दाखवीन."

"असला गाढवपणा नाहीं करायचा."

"गाढवपणा नाहीं. खर्च कमी करायला सांगितलातना मघाशीं, त्याचीच अंमलबजावणी आहे ही."

इतक्यांत आप्पांकडे कुणी तरी आलें व ते निघून गेले. मी खोलींत खूप

वेळ रडत बसलें. त्या दिवशीं मी जेवलेंसुद्धां नाहीं. आप्पांनीं दोनतीनदां हाका मारल्या. शेवटीं आजी ताट घेऊन वर आली तरी मीं अन्नाला बोट लावलें नाहीं. संध्याकाळीं आप्पा वर आले व समजूत घालीत म्हणाले, " हें बघ, शकू, महिन्याला टांगेभाड्याकरितां माझे दहा रुपये खर्च होतात. तूं गाडी ठेवल्यावर तेवढे मी तुला देत जाईन. " या दिवसांत घोडागाडी ठेवायला पाहिजेत कमींत कमी पाउणशें रुपये आणि हे दरिद्रीनारायण देऊं करताहेत दहा ! " आग लावा तुमच्या दहा रुपयांना. रस्त्यावर मी माझ्या पोरीचा नाच करून पैसे मिळवीन, पण तुमच्याकडून एक कवडी जास्त घेणार नाहीं." आप्पा बिचारे तोंड वांकडें करून खालीं गेले. माझे अश्रु आतां सुकले होते. पण डोकें भडकलें होतें. महागाईमुळें महिन्याची रक्कम वाढवायची तर राहिलीच बाजूला आणि जे काय दोनचार रुपये शिल्लक टाकले त्याच्यावरच यांचा डोळा. पक्के भटजी आहेत कोंकणचे. त्यांना दिवाण करा, नाहीं तर ' सर ' करा. कडू कारलें, तुपांत तळलें, साखरेंत घोळलें, तरी कडू तें कडूच. हरकत नाहीं, नकोत मला जास्त पैसे. तेवढ्यांतच दाखवतें गाडी ठेवून.

पण आतां त्याच्यासाठीं काय केलें पाहिजे ? कात्री कुठें लावतां येईल ? वर्षभर कपडे घेतले नाहींत तरी चालेल. पण तेवढ्यानें अशी किती बचत होणार आहे ! फार तर महिना पंधरा रुपये. खाण्यापिण्यांत कांहीं कमी करतां येईल का ? सई व मी रोज अच्छेर अच्छेर दूध पितों. तें येईल कमी करतां. पण पोरगी रोडावेल. नको, तिच्यावर नको आपला राग काढायला. आपण आपल्यावरच काय ते प्रयोग करावे. हो, फळांत आपले पुष्कळ पैसे जातात. आतां यापुढें फळें काय तीं आप्पांपुरतींच आणायचीं. आपण बोट लावायचें नाहीं. सईलाहि फळांची इतकी कांहीं जरूरी नाहीं. दूध ठीक आहे. पण फळें दिलीं नाहींत तरी चालेल.

दुसऱ्याच दिवशीं चहाच्या वेळीं सई सफरचंद मागूं लागली. आप्पा एक

फोड कापून तिला देऊं लागले. मीं मध्यें मोडता घातला. " सई, आतां महागाई झाली आहे. तुला व मला यापुढें फळें मिळणार नाहींत. " " मग आजोबा एकटाच खाणार ? " " हो. " " कां म्हणून. " " कां म्हणजे त्यांचे पैसे आहेत म्हणून. तूं मिळवीत नाहींस व मीहि मिळवीत नाहीं. तेव्हां फळें खायचा आपल्याला हक्क नाहीं. " सफरचंदाची फोड आप्पांनीं तशीच बशींत ठेवून दिली. माझा प्रत्येक शब्द त्यांच्या काळजाला घरे पाडीत होता हें मी ओळखून होतें. पण तेवढ्याकरितांच तर मी खुनशीपणानें मोजून बोलत होतें. सई बिचारी अजून त्या फोडीकडे पाहातच होती. तिला लेकराला माझा खुनशीपणा इतक्यांत कसा समजावा ? " आई, म्हणजे तूं मला आतां कधींच फळें खावूं देणार नाहींस ? " तिचे डोळे पाण्यानें भरून आले, तेव्हां कोठें माझ्या कठोरपणाला थोडा पाझर फुटला. " फक्त सुट्टीच्या दिवशीं तुला फळें खायला मिळतील. इतर वारीं मिळणार नाहींत, समजलीस ? " अशी पुस्ती मीं जोडली.

या प्रकरणाचा एवढाच परिणाम झाला कीं आप्पा जेव्हां मुंबईहून परत येत तेव्हां बरोबर आणलेल्या फळांचे पैसे पूर्वीप्रमाणें माझ्याकडून घेईनासे झाले. असेंच एकदां ते पहांटेच मुंबईहून फळाची एक मोठी करंडी घेऊन परत आले व सईच्या बिछान्यावर जाऊन बसले. तिला कुरवाळीत जागें करून ते म्हणाले, " बाबी, आज मुंबईहून मीं काय आणलें आहे ? " सई ताडकन् उठून बिछान्यांत बसली व म्हणाली, " खेळ आणला आहेस ? " " नाहीं टोपली भरून पीचिस व पेअर्स आणलीं आहेत. " हें एकतांच वाकडें तोंड करीत सई म्हणते, " पण मला काय उपयोग त्यांचा ? आई मला खाऊं थोडीच देणार आहे. आज आहे मंगळवार. रविवारपर्यंत तीं संपून-सुद्धां जातील. " मी मोरींत होतें तेथेंच सईचे हे उद्गार माझ्या कानीं आले. बिचारी पोर ! द्यावी का तिला फळें खायला परवानगी ? पण नको. घडींघडीं

असें मऊ येऊन चालायचें नाहीं. आपल्या सात्त्विक संतापाची समाधि अजून पुष्कळ दिवस टिकवायाची आहे. आतां आप्पांनीं आपण होऊनच जर माझ्या जवळ सवलत मागितली तर कदाचित् आजच्या पुरती देऊं परवानगी. आप्पांनीं अर्थातच ती मागितली व मींहि फार कृपावंत होऊन ती दिली. त्यांत माझा विजय होता. स्वतः मात्र त्या फळांना हात लावायचें मीं अगदीं ऐटींत नाकरिलें.

हल्लीं मी घरांत, विशेषतः आप्पांशीं अगदीं कामापुरतें बोलत असें. बडबड नाहीं, चेष्टा नाहीं, वाद नाही, भांडण नाहीं. तोंडाचा फुगा करून काळ कंठीत होतें. संध्याकाळीं पत्तेकुटींत कधीं कधीं खेळायला जात असें. परत येतांना आप्पा टांगा करीत. पण मी चालतच घरीं येई. कारण टांग्याला पैसे द्यायचे कुठून ? अर्थात् बहुधा आप्पाच टांग्याचे पैसे देत असत; पण आतां मला त्यांच्या अधिक उपकाराचा स्वीकार करावयाचा नव्हता. तेव्हां ते खेळून उठताहेत असा रंग दिसला कीं हळूच आपला गाशा गुंडाळून मी दुसऱ्या दारानें माझा संरक्षक सोट्या हातांत फिरवीत चालतच घरीं यायची. एखादे वेळीं चुकून आप्पांनीं मला हटकलेंच आणि त्यांच्याबरोबर टांग्यांत बसायची वेळ आलीच तर घरीं पोंचतांच टांग्याचे पैसे पटकन् मी चुकते करायची. कारण आप्पांचे उपकार आतां नको होते ना मला ? खरेच लोकांच्या दृष्टीनें मीं अनेक गाढवपणे केले असतील; पण माझ्या दृष्टीनें पाहतां एकच गाढवपणा मला आढळतो. कोणता विचारल तर, स्वतः पैसे मिळवून आपल्या पायांवर उभी राहिलें नाहीं हा. स्त्रीनें काय किंवा पुरुषानें काय, कोणाचें मिंधें असूं नये. आज जर माझ्या कमाईचे पैसे खिशांत खुळखुळत असते, तर दहा घोडयांची गाडी ठेवायलासुद्धां नको म्हणायची कोणाच्या बापाची प्राज्ञा होती ? पण आतां काय त्याचें ? आतां याच परिस्थितीत एका घोडयाची गाडी तरी ठेवून दाखवलीच पाहिजे.

खर्चाच्या बाबतीत माझें आत्मनिरीक्षण जोरानें चालूच होतें. दूध व फळें तर वर्ज्य केलींच. आतां आणखी काय सोडतां येईल बरें ? दिवसांतून दहा वेळां घशाखालीं उतरणारें इहलोकीचें ऊन्ह ऊन्ह अमृत येईल सोडतां. म्हणजे साखर, दूध, कोळसे अथवा घासलेट यांची कितीतरी बचत होईल. बस्स, ठरलें. चहा सोडायचा.

मग जगायचें तरी कशाकरितां ? कशाकरितां म्हणजे, घोडागाडी ठेवून दाखविण्याकरितां.

आणि ती तरी आतां किती दिवस ठेवून दाखवायची ? हो, त्याला कांहींतरी मर्यादा घातली पाहिजे कीं नाहीं ? कारण आतां चहावर पाळी आली आहे. आप्पांच्या संस्मरणीय वाढदिवसानिमित्त ही आपत्ति आपण आपल्यावर ओढून आणली, तेव्हां पुढल्या वर्षीच्या त्यांच्याच वाढदिवशीं तिची सांगता करावी झालें. तोंपर्यंत मात्र आपला सत्याग्रह टिकवून दाखवायचा.

तेव्हां आतां आपल्या अन्नांत कांहीं कमी करतां येईल का ? पण प्रकृति मात्र बिघडतां कामा नये. कारण सईच्या जबाबदारींतून अजून मला पार पडायचें आहे. तेव्हां धडधाकट राहून खाण्यांत काय कमी करतां येईल ? हे गरीब लोक काय खाऊन राहत असतील ? दूध तूप तर त्यांच्या नाहींच कधीं दृष्टीस पडत; पण ताकसुद्धां बिचाऱ्यांना कधी कोणी आंबट चिंबट म्हणून धर्म केलें तरच मिळतें. पण ते किती काम करतात, आणि आजारी पाहावें तर क्वचितच पडतात ! आतां उद्यां पांडूच्या घरीं जाऊन पाहावें त्याची बायको जेवायला काय करते ती. एक वेळ भाकरी आणि एक वेळ भात. कसली तरी डाळ, नाहीं तर पिठलें. लसणीची चटणी नाहीं तर कांदा. झालें. संपला त्यांच्या ताटांचा शृंगार. भाजी नाहीं, कोशिंबीर नाहीं, तूप नाहीं, लोणी नाहीं, दूध नाहीं, पोळी नाहीं, दही नाहीं, ताक नाहीं. आपणहि

आतां असेंच राहावयाचें. पण एकदां डॉक्टरांचा सल्ला विचारलेला बरा. कारण त्या विभूतीनेंहि कच्चें खाऊन राहणें, फळें खाऊन राहणें, आपल्या दिनचर्येंत कोणताहि फेरबदल न करतां तेवीस दिवस उपास करणें, इत्यादि अघोरी पराक्रम केलेले मला माहीत होते. तेव्हां दवाखान्यांत जाऊन " प्रकृति बिघडूं न देतां स्वस्तांत स्वस्त असें कोणतें अन्न खाऊन माणसाला राहतां येईल ? " असा प्रश्न मीं केला. हें कांहीं तरी नवें वेड डोक्यांत शिरलें आहे अशी खूणगांठ मनाशीं बांधून डॉक्टरांनीं माझ्याकडे पाहिलें व विचारलें, " म्हणजे काय ? " इतका मोजका प्रश्न विचारला तरी यांना कळूं नये ! तेव्हां सगळी हकीकत इत्थंभूत सांगितली. नाहीं तरी आम्ही केव्हांतरी त्यांच्याजवळ ओकून टाकलीच असती. सगळें चऱ्हाट ऐकून घेतल्यावर डॉक्टरांनीं हा असला वेडेपणा न करण्याचा सल्ला मला दिला. लोकांना उपदेश करणें सोपें असतें, पण स्वतःवर असला प्रसंग आला म्हणजे मात्र हे राजेश्री माझ्यापेक्षां किती पट राख डोक्यांत घालतात तें मी आज सांगत नाहीं. असो. डॉक्टरांशीं वाद घालून मीं आपला आहार ठरविला.

बारा तास भिजविलेलें अन्न खाल्लें असतां फारच थोड्या धान्यांत माणसाची गुजराण होऊं शकते असें कळलें. नेहमीं आपण अन्न शिजवून मीठ मसाले वगैरे घालून त्याला अधिक चव आणतों व जरूरीपेक्षां किती तरी पटीनें जास्त अन्न खातों. तेव्हां आतां एक वेळ डाळी, कडधान्यें वगैरे भिजवून खायचीं व एकच वेळ जेवायचें असें ठरवलें आणि कच्च्या अन्नाची संवय झाली कीं शिजलेल्या अन्नाला अजीबात फांटा द्यायचा बेत होता. दूध, तूप, लोणी सोडलेंच होतें, तेव्हां डॉक्टरांनीं ताक व तेल हीं खाण्यांत आलीं पाहिजेत असें फर्माविलें. त्याप्रमाणें भाकरीशीं मीं तेल घेऊं लागलें, व रात्रीं ताक पीत असें. पहिल्या महिन्यांत माझें वजन खाडकन् नऊ पौंड कमी झालें. होईल नाहीं तर काय ? बिनतुपाच्या कोरड्या भाताचा घांस

किती वेळ तरी तोंडांत फिरत राही आणि तें भिजविलेलें कडधान्य ! अर्धी वाटी हुलगे घशाखालीं उतरायला पाऊण तास लागे. चहा तर केव्हांच सोडला होता.

ही सर्व योजना आंखण्यापूर्वी तिचा बोभाटा कुठेंहि न करण्याचा व कोणी आपल्याकडे आल्यास त्याला कळूं न देण्याचा मीं निश्चय केला होता. तेव्हां साहजिकच कोणी सकाळीं बसायला आलें म्हणजे मला मनांतून इतका आनंद होई ! बाहेरून तो मी दाखवीत नसें, पण होई हें खास. कारण त्या निमित्तानें मला चहा प्यायला मिळायचा. किंवा कोणी जेवायला आलें, तर लोकांसमोर म्हणून पूर्वीसारखें जेवायलाहि मिळे. बाकी घरीं कोणी आल्यास मी पूर्वीप्रमाणें खातेंपितें हें आठदहा दिवसांतच आजीनें मात्र ताडलें होतें. आणि कधींहि कोणाला जेवायला न बोलावणारी आजी आतां लोकांना जेवायला ठेवून घेऊं लागली व चहाचा कट्टा द्वेष करणारी तीच आजी लोकांना चहाचा आग्रह करूं लागली. हेतु हा कीं, आपल्या शकूच्या पोटांत कांहीं-तरी जावें. ही गोष्ट उमजायला आप्पांना महिनाभर लागला. पूर्वी त्यांना भेटायला आलेलें माणूस माझ्या कितीही दाट परिचयाचें असलें तरी त्या माणसानें मला भेटण्याची इच्छा दर्शवल्याखेरीज आप्पा मला कधींही हांक मारीत नसत. तेच आप्पा आतां माझ्या अगदीं पुसट ओळखीचेंही कोणी त्यांच्याकडे आलें तरी मला हांक मारून त्याला चहा वगैरे द्यायला सांगून माझ्या चहाची सोय करून देत. तसेंच कोणाकडे गेल्यासहि त्यांनीं जर चहा वगैरे विचारला, तर आपण तो सोडला असल्याचें सांगून आपलें दुःख वेशीवर टांगायचें नाहीं, असेंहि प्रथमपासून ठरविलें होतें. तेव्हां पहिल्या नंबरची माणूसघाणी व तुसडी अशी मी जुन्या जुन्या ओळखी उकरून काढूं लागलें, लांबलांबचीं नातीं आठवूं लागलें. हें सर्व मी जाणूनबुजून करीत असें असें नाहीं. पण चहाची तलफ

आली कीं, दारूबाजाप्रमाणें माझी अवस्था होई व आतां कोणाचें घर गांठूं, असें होऊन जाई. बरें घर गांठून आंत जावें आणि "मामी, काकू, मावशी, गरम गरम चहा टाका बाई" असें म्हणावें तर पूर्वीचा माझा मोकळेपणा या सत्याग्रहांत पार नाहींसा झाला होता. शिवाय मीं तर चहा सोडला होता, तेव्हां "चहा द्या" हे शब्द तरी कोठल्या तोंडानें उच्चारायचे? मग काय, आपलें टुकत बसायचें, आणि "चहा हवा का" हे शब्द कानीं यायची वाट पाहायची! चहा मिळला नाहीं असें बहुधा होत नसे. कधीं कधीं तर बरोबर कांहीं खायलाहि मिळे. त्या वेळच्या त्या माझ्या अर्धपोटीं तें सर्व कांहीं इतकें रुचकर लागे कीं कांहीं विचारूं नका. पण असल्या भिक्षांदेहीनें कितीसें समाधान होणार?

हें सर्व चालू असतां कारखान्यांत आमच्या फेऱ्या चालूच होत्या. मालक कधीं भेटलाच तर "आठ दिवसांत देतों, दहा दिवसांत देतों" अशा बाता मारी, आणि भेटलाच नाहीं तर सगळाच आनंद! आमचे मध्यस्थ डॉक्टरहि दोनदां जाऊन आले. तरी गाडी नीट व्हायची तारीख कांहीं जवळ येईना. रागावून त्यांनीं एक पत्रहि लिहिलें; पण त्याचें उत्तर येतें आहे कशाला? शेवटीं मीं असें ठरवलें कीं आतां आपण कांहीं कारखान्यावर खेटे घालायचे नाहींत. एकदां त्याच्या हातांत सांपडलों आहों खरे, जेव्हां सुटूं तेव्हां सुटूं. हिशेब चुकता करायच्या वेळेला मात्र पुरता सूड घ्यायचा. आतां मूग गिळून स्वस्थ बसायचें.

इकडे गाडी नीट होत असल्याची वार्ता पुण्यास पसरली होती. घोड्यांचे मालक आपापलीं घोडीं दाखवायला घेऊन येत होते, व मी तीं मागून-पुढून नीट न्याहाळून पाहत होतें. ढुंगणावर एक थाप मारायची, मानेवर दुसरी, व कपाळावर हात फिरवीत घोड्याचें वय काय तें विचारायचें. मालकानें एक आकडा सांगितला कीं घोड्याचें तोंड उघडून दांत दाखवायला सांगून

आपण वय दोनतीन वर्षे जास्त असल्याचें विधान करायचें. मग पायाकडे नजर टाकायची व जनावर चालवून पहाण्याकरितां टांग्यांत चढून लगाम हातीं घेऊन घोडें चालू करायचें. घोडें दाखवायला येई तें बहुधा टांग्याला जोडूनच येई; तेव्हां पुढें बसून तें हांकणें कांहीं कठीण नव्हतें. कधीं कधीं मात्र घोडें गाडीला जोडलेलें असे. तेव्हां मात्र मागें गाडींत उभें राहून त्याची चाल पाहाणें, घटकेंत खालीं पायरीवर उतरून बाजूनें त्याचे पाय न्याहाळणें, रस्त्यावर आपल्या समोरून सर्व चालीनें घोडें दोनतीनदां न्यायला सांगणें, प्रसंगीं वर गाडीवाल्याजवळ बसून लगाम हाती घेऊन चाबूक फडकावणें, इत्यादि चेष्टा मी मनसोक्त करून घेई. बगींत घोडेवाल्या-जवळ बसण्याकरितां लहानपणीं मी मुलांबरोबर कशी कचाकच भांडलें आहें! काय सुख आहे वाटे वर बसण्यांत. आतां तर नुसती बसत नव्हतें, तर एका हातांत लगाम व दुसऱ्या हातांत चाबूक घेऊन घोडा उडवीत होतें. अहाहा! ऐटीत उंचावर बसून खालीं पाहतांना सर्व सृष्टि इतकी तुच्छ वाटे कीं, स्वर्ग स्वर्ग तरी याहून काय अधिक असेल असा विचार मनांत येई. हजारों रुपये किमतीच्या मोटारींतून वावरणारे लोक सुद्धां पांच हात खालच्याच जगांत फिरत असत. परंतु अद्याप मनाजोगें जनावर आढळलें नाहीं. रस्त्यानें जातां येतां माझी नजर येईल जाईल तें घोडें पाहून घेत असे. एखादें सुंदर उमदें घोडें भरधांव जातांना कानीं आलें तर तत्काळ त्या दिशेला वळून, त्याच्यावर दृष्टि खिळवून, तें जाईल तसतशी वळून मी शेवटपर्यंत त्याच्याकडे अधाशीपणें पाहत राहीं. एखाद्या सुंदर स्त्रीकडे पुरुषसुद्धां इतक्या भुकेल्या नजरेनें पाहत नसतील. घोड्याखेरीज त्या वेळीं मला दुसरे कांहीं दिसतच नव्हतें व घोड्याच्या तालबद्ध टापांव्यतिरिक्त दुसरा कोणताहि नाद माझ्या कानांत शिरत नव्हता.

इकडे गाडीच्या कारखान्यावर मी कधींच फिरकलें नव्हतें. परंतु तो कांटा

परस्पर एका तिऱ्हाईत ठिकाणाहूनच काढला गेला. माझ्या ओळखीच्या एका सुखवस्तु गृहस्थांनीं एक घोडा विकत घेतला होता, परंतु मनाजोगी गाडी न मिळाल्यामुळें तो काढून टाकायचा त्यांचा विचार होता. मला घोडा पाहिजे हा सुगावा त्यांना लागला होता व त्यांनीं चवकशीकरितां माझ्याकडे माणूस पाठविला. "गाडी नीट झाली कीं आपलें घोडें जोडून पाहतें" असा उलट जबाब मीं दिला. तेव्हां गाडी नीट व्हावी याची माझ्यापेक्षां त्यांनाच अधिक घाई वाटूं लागली. व कारखानदाराकडे माझ्या वतीनें त्यांनीच तगादा सुरू केला. माझें आयतेंच फावलें व लवकरच "आपली गाडी तयार झाली आहे ती पाहून यावें" असा निरोप घेऊन त्यांचे चिटणीस टांगा घेऊन आले. त्यांचें विकाऊ घोडें टांग्याला जोडलें होतें, तेव्हां तें चालवून पाहण्याकरितां मींच पुढें बसून टांगा हांकलला व आम्ही कारखान्यांत येऊन ठेपलों. मालक घरीं नव्हता; पण गाडी तयार झाली होती. सांगितल्याप्रमाणें काळा रंग दिला होता. मात्र वर सोनेरी रेघ काढली नव्हती व मला हवा तो सोनेरी छापहि काढला नव्हता. तेवढें काम मागाहून करून घेतां येईल असें वाटून मीं बरोबर आणलेलें घोडें गाडीला जोडायला सांगितलें व लकलक करणारी माझी नवी गाडी उडवीत मी कारखान्यांतून निघालें, आणि डॉक्टरांच्या दवाखान्याशीं येऊन उभी राहिलें. दाराबाहेर गाडी थांबलेली ऐकतांच स्वारी शंका येऊन खिडकींतून पाहूं लागलीच होती. त्यांना खाली यायची विनंती केली व त्यांना घेऊन एक चक्कर मारून आलें. नाहीं तरी घोडें एकदां त्यांच्या नजरेखालून घालायचेंच होतें. कारण हे कांहीं फक्त आम्हांलाच औषध देणारे डॉक्टर नाहींत. आमचीं मांजरीं–कुत्रीं सुद्धां त्यांच्याच औषधानें बरीं होतात. मग एवढें मोठें जनावर घ्यायचें तें त्यांना दाखवल्याशिवाय कसें घ्यावें? शिवाय या राजेश्रीनी लढाईवर असतांना घोडयांच्याहि कांहीं कमी उलाढाली केल्या नाहींत. घोडें मात्र त्यांना विशेष पसंत पडलेंसें दिसलें

नाहीं; पण ते त्याला एकदम वाईटहि म्हणेनात. त्याची छाती लहान होती, पण वयहि लहान होतें. भरपूर दाणागोटा मिळाल्यावर कदाचित् भरेल असा त्यांचा शेरा पडला. तेव्हां मी घरीं आल्यावर " चार दिवस घोडें माझ्याकडे राहूंदे व नंतर कळवतें " असा निरोप घोडयाच्या मालकांना पाठवला. त्यांनींहि माझ्या योजनेला तत्काळ मान्यता दिली.

घोडें ठेवून घेतलें पण घोडेवाला कुठें होता ? तेव्हां त्यांचाच माणूसहि ठेवून घेतला. झालें, दाणापाणी गवत सर्व व्यवहारांची उठाठेव करणें प्राप्त झालें. घोडयाचें नांव होतें ' यशवंत. ' नांव ठेवणारा बेटा रसिक असला पाहिजे. यशवंत ! तानाजीच्या घोरपडीचें नांव सुद्धा यशवंतीच होतें; आणि हा यशवंत. इतकें सुंदर नांव असल्यावर मग आणखी काय पाहिजे ? मी आपल्या हातानें त्याला पाणी पाजूं लागलें ! ' यशवंता, यशवंता ' करीत मी त्याला दिवसांतून किती वेळां तरी गोंजारून येई. त्याच्या गळयांत मिठी मारून त्याच्या कपाळाचे मुके घेई. सईहि सारखी त्याच्या मखमली नाकावरून हात फिरवी व आपला गाल त्या मऊमऊ नाकावर घाशी. तोहि गुलाम आम्ही कोणी दृष्टीस पडतांच फुरूफुरूं लागे व मान हालवून आम्हांला जवळ बोलावी व आमच्या अंगावर आपलें डोकें घाशी. दुपारीं यशवंताकरितां गांवांत जाऊन हरबरा व भुसा आणला, विलायती गवताच्या दोन पेंढया आणल्या. दीड महिना आपल्या पोटाला चिमटा घेऊन जे दहावीस रुपये शिल्लक टाकले होते ते आतां या यशवंतरावांना पांच-पांच मिनिटांनीं प्रेमानें चारीत होते.

यशवंताला घरीं ठेवून घेतल्याच्या तिसऱ्या दिवशीं एक गाडीवाला नोकरी शोधीत आला, मलाहि एक मोतद्दार पाहिजेच होता. तेव्हां मीं त्याला ठेवून घेतला. दोन दिवस त्यानेंच यशवंताला जोडून गाडी चालविली. डॉक्टरांच्याकडे माझ्या पुष्कळ खेपा झाल्या. जीन पाहण्यासाठीं आम्ही

एकदां लष्करांत जाऊन आलों, व तेव्हाच त्यांच्या एका अश्वप्रेमी स्नेह्यांकडे जाऊन यशवंताला दाखवून आणला. त्यांनाहि यशवंत विशेष पसंत पडला नाहीं, आणि सांगितल्या किंमतीला तर तो मुळींच घेऊं नका, निम्म्या किंमतींत देत असतील तर घ्या, असा त्यांचा सल्ला पडला. मला मात्र यशवंताला परत करावेंसें वाटेना. कारण या चार दिवसांत मला त्याचा फार लळा लागत होता. तेव्हां तो पन्नासच रुपये कमी किंमतीला देत असाल तर घेतें, असें मीं यशवंताच्या मालकांना कळविलें. पण त्यांना तें न पटून माझा चार दिवसांचा यशवंता परत गेला. मला वाईट वाटलें खरे, पण तो गेला हें सुदैवच म्हणावयाचें. कारण पुढें कांहीं महिन्यांनीं तो मेला असें कळलें.

यानंतर बरींच घोडीं येऊन गेलीं. प्रत्येक वेळीं मी तीं हांकून पाहीं व डॉक्टरांकडे घेऊन जाई; मग ते दवाखान्यांत असोत वा घरीं असोत. एकदां तर ते बाहेर माझें घोडें तपाशीत असतां त्यांच्याकडे येणाऱ्या एका दुखणेकऱ्याला प्रश्न पडून " आपण माणसांचेच डॉक्टर आहांत ना ? " असा त्यानें सवाल केला.

असें करतां करतां गाडी घरीं येऊन दोन महिने झाले; गाडीवाल्याचा पगार चालूच होता. रोज सकाळीं कोरीकरकरीत गाडी पुसायची एवढेंच त्याला काम. तेव्हां एक दिवस बागेंत गवत फार वाढलें होतें तें जरा त्याला काढायला सांगितलें, तर त्यानें चक्क सांगितलें मला माळ्याचें काम येत नाहीं. असें उत्तर आल्यावर आमची स्वारी गरम झाली. " ठीक आहे, तर मग आज दुपारीं तुझा पगार चुकता करतें, कारण माळ्याचें काम तुला येत नाहीं आणि सध्या घोड्याचं काम माझ्या येथें नाहीं. " मी एकदम इतकी निकरावर येईन अशी त्याची कल्पना नसावी. कारण त्यानें दुपारपर्यंत आगाशीअसपासचें सर्व गवत काढलेलें दिसलें, व दुसऱ्या दिवशीं

एक दलाल मला भेटायला येणार आहेत अशीहि वार्ता मला त्यानें कळवली.

एक वृद्ध गृहस्थ दुसऱ्या दिवशीं सकाळींच माझ्याकडे आले व बोलाईच्या खाणीजवळ एक उत्तम घोडें असल्याचें सांगूं लागले. घोडें घरीं दाखवायला घेऊन यायला सांगितलें तर असें कळलें की, घोडें घरीं येणार नाहीं, तेथेंच जाऊन पाहिलें पाहिजे. वा ! बरेंच शिष्ट आहे कीं घोडें ! बहुधा चांगलें असावें. एरवी इतका मानपान करून घेणार नाहीं !

लगेच मीं माझी नेहमींची रावजीची गाडी बोलावली व माझ्या गाडीवाल्याला घेऊन त्या गृहस्थांबरोबर बोलाईच्या खाणीवर येऊन ठेपलें. घोडें तबेल्यांत बांधलें होतें. माझ्या कयासाप्रमाणें तें अतिशयच देखणें होतें. पंधरा मुठी उंच, छाती खूप रुंद, पृष्ठभाग भरलेला, कमानदार मान, शिवाय रंग काळाकुळीत; सर्व कांहीं अगदीं माझ्या मनासारखें होतें. पुढच्या दोन्ही पायांना मात्र फडकीं बांधलेलीं होती. तीं कशाकरितां असें विचारतां मोतद्दारानें तीं सोडून गुडघे साफ असल्याचें दाखविलें. घोडें चालू आहे का असें विचारतां कळलें कीं, मालक दहा दिवस गांवाला गेला असल्यामुळें बसून आहे. घोडें गाडीला चालतें का, म्हणून प्रश्न करतां समजलें कीं, हल्लींचा मालक फक्त स्वारीलाच वापरीत असतो. हें एकतांच तर माझ्या तोंडाला पाणी सुटलें. कारण घोड्यावर बसण्याची तर मला फार आवड. आप्पा नको नको म्हणत असतां मी केंब्रिजमध्यें घोड्यावर बसायला शिकलें आणि जिनीव्हामध्यें तर खूपच बसत होतें. तेव्हां घोडें स्वारीचें आहे असें कळतांच मी हर्षभरित होऊन गाडीची गोष्टसुद्धां क्षणभर विसरून गेलें. पण मोतद्दारानेंच "आपल्याला घोडें गाडीला पाहिजे कीं स्वारीला ?" असें विचारल्याबर मी जागी होऊन दोन्हीला पाहिजे असल्याचें सांगितलें.

" घोडें गाडीला चालतें का ? " असें मोतद्दाराला मीं विचारतांच आमचे दलालच मध्यें म्हणतात, " आणि नसलं चालत तरी शिकवायला किती वेळ लागणार ? " त्यावर माझ्या गाडीवाल्यानें पुस्ती जोडली, " रावसाहेब शिकवून चांगलं तयार करतील. कितीक घोडीं शिकविलींत त्यांनीं. " घोडयाचा मालक कोण व कुठें राहतो याची चौकशी केली तेव्हां तो एक साहेब असून लष्करांत रहात असल्याचें कळलें.

लगेच त्याच्याकडे जाऊन आम्हीं किंमत वगैरे विचारली. इतक्या सुंदर जनावराच्या मानानें किंमत फारशी नव्हती. घोडें कां काढतां असें विचारतां, मालकानें बदली झाली असल्याचें सांगितलें. मग बरोबर. सगळा बाजार आटोपून जायचें असल्यावर मग किंमत ठेवली असेल कमी. मात्र घोडें चांगल्या घरीं जात असलें तरच आपण देणार; भाडोत्रीला देणार नाहीं अशी आपली अट असल्याचें साहेबानें स्पष्ट केलें. त्यावर मीहि माझें नांव गांव सांगून घोडें चार दिवस घरीं ठेवून वापरूं दिलें तरच मी पुढला विचार करूं शकेन अशी माझी नेहमींची योजना त्याच्यापुढें मांडली. त्यानेंहि माझ्या म्हणण्याला तात्काळ रुकार दिला. कां नाहीं देणार ? बापाचें नांव होतें आणि माझा नखरा होता. जातां जातां घोडयाचें पथ्यपाणी काय आहे तें विचारून घेतलें. हो ! साहेबाचें घोडें ! कांट्याचमच्यांनीं जेवत असलें तर ! घोडेसाहेबांना ओट व गाजरांचा खुराक असल्याचें कळलें. आमच्या यशवंतरावांकरितां आणलेला हरभरा व भुसा होता घरांत. पण या साहेबाकरितां आतां ओट्स् हवेत विकत घ्यायला व गाजरांचाहि रतीब लावला पाहिजे.

इकडे घोडें घरीं नेण्याकरितां आम्ही परत तबेल्यांत गेलों व माझ्या माणसाला घोडें सोडायला सांगितलें. पण तबेल्याचा मालक घोडें सोडूं देईना. त्याचें भाडें बुडलें असतें, व परस्पर दुसऱ्या दलालामार्फत व्यवहार

चालला असल्यामुळें त्याची दलालीहि बुडाली असती. त्या साहेबाच्या मोतद्दारानेंहि त्याला सांगून पाहिलें; पण तबेल्याचा मालक कांहीं ऐकेना. मालकाची चिठ्ठी आणा म्हणजे जनावर देतों असें त्यानें ठासून सांगितलें. मग करतां काय, आम्ही गेलों पुन्हां त्या साहेबाकडे आणि आणली त्याची चिठ्ठी. घोडें सोडलें व बाहेर आणलें.

गाडीला जोडूनच घरीं जायचा विचार होता; पण बाहेर येतांक्षणींच तें काय फुरफुरूं लागलें; खिंकाळे काय, पुढले पाय काय वर करी, थयथय नाचे कोण, घटकेंत पुढल्या पायानें जमीन काय उकरूं लागे! या घोड्यावर का मी स्वारी करणार? राम म्हणायला लावील. आणि गाडी तरी ठेवील का जाग्यावर? नाहीं तर आपली आली आहे नुकतीच नीट होऊन, ती परत कारखान्यांतच पाठवायची वेळ यायची. तेव्हां घोडें आज पायींच घरीं न्यावें हें बरें. घोडें होतें मात्र सुंदर यांत शंका नाहीं.

हो, त्याचें नांव सांगायचें राहिलेंच कीं! 'नेपोलिअन!' वा; नेपोलिअन नांव असल्यावर त्यानें मस्ती करूं नये तर काय गांधींप्रमाणें प्राणांतिक उपास करावे? नेपोलिअनच्या मोतद्दाराला व माझ्या गाडीवानाला त्याला पायीं घरीं न्यायला सांगून आमचे दलाल व मी गाडींतून घरीं येऊं लागलों. येतां येतां वाटेंतच ओट्स् विकत घेतले. घोडें चार मैल चालून आल्यावर थोडें तरी नरम येईल व मग तें आपण जोडून पाहूं अशा आमच्या योजना चालल्या होत्या. आमचे दलालहि त्या घोड्याच्या दांडगेपणाचीं रसभरीत वर्णनें करीत होते व त्याबरोबर आपण अनेक खाष्ट जनावरें मऊ आणल्याच्या हकिकतीहि सांगत होते. येतां येतां त्यांनीं गाडी आपल्या घरीं उभी केली व दोन भक्कम दोरखंड आणायला सांगितले. ते कशाकरितां असें विचारतांच, "रावजीच्या गाडीचे पट्टे जुने आहेत. हें नवें घोडें एखाद वेळेस ते तोडून टाकील; तेव्हां तें या दोरखंडानेंच गाडीला जोडलें म्हणजे

कांहीं भीति नाहीं, " असें आश्वासन त्यांनीं मला दिलें. पण मला जास्तच भीति वाटूं लागली होती. दोरखंड घेऊन गडी येतो तों त्यालाहि त्यांनीं गाडींत बसवून घेतला व वाटेंत आणखी एक इसम गोळा केला. मी विस्मित होऊन त्यांच्याकडे पाहूं लागलें तर, घोडयाबरोबर पुढें पळायला माणसे पाहिजेत; घोडें बेफाम आहे, तीन चार माणसांखेरीज तें आंवरायचें नाही; वगैरे वीरश्रीच्या पुष्कळ गोष्टी त्यांनीं मला ऐकवल्या. इकडे माझा जीव अगदीं थोडथोडा होऊं लागला होता. घोडें घोडें म्हणून हा एखादा वाघबीघ तर नाहींना मी घरीं आणीत ? असलें जनावर घ्यायचें म्हणजे आपल्याला चार घोडेवाले ठेवले पाहिजेत. टाकूं का लगेच परत करून ? पण नको. आतां असा भागुबाईपणा करण्यांत अर्थ नाहीं. आणलें आहे चार दिवस घरी तर तितकी कळ सोसलीच पाहिजे. मग हवें तर परत करावें.

ओट्स्, दोरखंड, गडी वगैरे घेऊन आम्ही परत येतों तों राजे नेपोलिअन घरीं येऊन थडकले होते, व माझ्या गाडीवाल्यानें पुढें टाकलेलें गवत खात होते. ' नेपोलिअन ' अशी हांक मारून मी त्याची मान थोपटली, तर तो अगदीसुद्धां गुरगुरला नाहीं. उलट माझ्या हातांतले मूठभर ओट्स् खाऊन आणखी मागूं लागला.

रावजीनें आपलें घोडें सोडलें व आमचे वृद्ध दलाल काचा मारून, उपरणे कमरेभोंवतीं घट्ट गुंडाळून नेपोलिअनला दोरी बांधून शेजारच्या वावरांत जाऊं लागले. आतां ही स्वारी काय करणार असा विचार करतें, तों त्यांनीं नेपोलिअनला रिंगणावर धरला. दहा मिनिटें त्याला चांगला दौडवला व ते त्याला परत घेऊन आले व त्याच्यावर खोगीर चढवूं लागले. घोडें गाडीला जों जों अधिक जखडलें जाई, तों तों तें अधिक नाठाळपणा करी. जुंपणें संपल्यावर आमच्या दलालांनीं खिशांतून काथ्याची दोरी काढली, त्यावर माझा गाडीवाला पुटपुटला " काथ्याची कांहीं जरूर नाहीं रावसाहेब. मला

माहीत आहे हें घोडें." "काय माहीत आहे डोचकं ? घोडं आणि गाढव यांतला फरक तरी माहीत आहे का तुला ?" असें म्हणून दटावतांच तो म्हणतो, "न्हाइलं, तुमच्याच मनाजोगं होऊं द्या." झालें; नेपोलिअनच्या नाकावर त्यांनीं करकचून काथ्या बांधला तसा तो अधिकच चिडला व मानेला हिसडे देऊं लागला. त्यासरशी त्यांचे दोन जवान त्याच्या दोनहि बाजूला झाले व त्याला फाटकाच्या बाहेर नेऊं लागले. पण आमचा नेपोलिअन बिथरला होता. तो कांहीं बाहेर जाईना. मागेंच ओढ घेऊं लागला. गाडीचा पोलहि फाटकाला लागून थोडासा खरचटला. तेव्हां आधीं गाडी बाहेर काढून मग त्याला बाहेरच जोडावा असें ठरले व फिरून सर्व सोडासोडी व जोडाजोडी झाली. "मला गाडींत बसायचं, गाडीवाल्याजवळ बसायचं" म्हणून सई भुंग्यासारख्या घिरट्या घालीतच होती. नेपोलिअनच्या दणदणाटांत ती कोठें तरी चिरडून जाईल अशी भीति वाटून, मी तिला माडीवर कोंडून आलें.

नेपोलिअन गाडीला जोडून सज्ज झाला. आमचे दलाल गाडीवर चढले माझा गाडीवाला शेजारीं बसूं पाहत होता; पण त्यांनीं त्याला खालींच राहायला सांगितलें. दोन गडी घोडयाच्या दोन बाजूला, व माझा गाडीवाला व मी मागल्या चाकांशी उभे होतों. घोडा मागें सरकूं नये म्हणून मागल्या चाकांखालीं आम्हीं दोन धोंडे लावले. नेपोलिअननें जोरांत मागें एक पाऊल टाकलें; पण गाडी हलेना असें पाहून, त्यानें एकदम गाडी पुढें ओढली आणि तो चौखूर उधळला. मला गाडींत बसायचें होतें, पण तें घोडें कसचें थांबतें ? तें वाऱ्यासारखें धावूं लागलें. आमच्या चिमण्याशा रँग्लर परांजपे रोडच्या वळणावर हें कोठें तरी गाडी आदळणार अशी धास्ती मीं घेतली व वेडयासारखी गाडीमागें धावूं लागले. जणुंकाय मी त्याला थांबवूं शकणार होतें. पण त्यानें तें वळण नीट सफाईनें घेतलें व वर गणेश-

खिंडीच्या बाजूला भुर्रकन गाडी घेऊन तें गेलें सुद्धां. आतां मी गाडींत बसणार कशी व नेपोलिअनची परीक्षा घेणार कशी ? कोपऱ्यावरच माझ्या ओळखीची एक मुलगी सायकलवरून येत होती. तिला अडवलें व तिची सायकल घेऊन मी नेपोलिअनचा पाठलाग करीत जोरजोरानें पाय मारूं लागलें. गणेशखिंडीच्या नाक्यांपर्यंत आलें. येथे पांच रस्ते फुटतात. कोणत्या रस्त्यानें नेपोलिअन गेला असेल ? आला कां आतां युद्धांतला पेंचप्रसंग. नाक्यावर एक शिपाई होता. त्याला नेपोलिअनच्या सर्व थाटाचें वर्णन करून गाडी कोठल्या रस्त्यानें गेली तें विचारलें. त्यानें खडकीचा रस्ता दाखवला. लगेच आम्हीं तिकडे सायकल हाणली. आगगाडीच्या फाटकाच्या अलीकडे गाडी थांबलेली दिसली. कांहीं तरी अपघात करूनच हे अश्वराज थांबले असतील, अशी माझी खात्री होती. जवळ येऊन पाहतें तों तसें कांहींएक नसून केवळ आगगाडीचें फाटक बंद होतें म्हणूनच ही स्वारी थांबली होती असें आढळून आलें. नशीब माझें ! त्या आगगाडीला तरी माझी कीव आली, नाहीं तर नेपोलिअनचा पाठलाग मला कोठवर करावा लागला असता राम जाणे ! सायकल गाडीवाल्याच्या हातीं देऊन मी गाडींत चढलें. मीं गाडी गांठलेली पाहून आमच्या दलालांनीं जरा वांकडेंच तोंड करीत आपला घाम पुसला. फाटक उघडल्यावर गाडी चालू झाली. मी आंतच उभी राहून पाहत होतें. घोडें सात्रक जाऊं पहात होतें तों दलालांनीं चाबकाचा एक फटकारा मारून त्याला दुडाण जायला लावलें. दोनहि गडी बाजूला धांवतच होते. गाडीनें लगेच घरचाच रस्ता धरला. घोड्याचें अवसान मला फारच पसंत होतें. मस्तच जनावर होतें तें. तें कोणाच्या मनांत भरणार नाहीं ?

घरीं आल्यावर हुश्श करीत घोडें सोडतांना आमच्या दलालांनीं मालकाला काय कळवायचें असा प्रश्न केला. मी जरा चकितच झालें. " अहो,

इतक्यांत काय सांगायचें आहे ? चार दिवस हांकून पाहून मग सांगूं काय सांगायचें तें. सुधेपणीं तें गाडीला चाललें तर पाहिजे." "महिना–पंधरा दिवस शिकवल्यावर अगदीं तुमची मुलगीसुद्धां हांकील. मीं यापेक्षां कितीक खाष्ट जनावरं मऊ आणलीं आहेत." "होयना, मग फारच उत्तम. आतां असं करा, उद्या सकाळीं तुम्ही फिरून या. मीहि लगाम जरा हातीं घेऊन पाहीन." ठीक आहे," असें म्हणून ते गेले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ते कांहीं आले नाहींत.

मी सबंध दिवस घरीं राहिलें. नवी करमणूक होती घरीं. नेपोलिअन तर यशवंतापेक्षां गरीब होता. नुसता बांधलेला असला कीं हाच तो गाडी घेऊन उडून जाणारा नेपोलिअन असें वाटलेंसुद्धां नसतें कुणाला. मी त्याच्याशीं किती तरी बोलत बसे. मराठींत नाहीं हो ! त्याला मराठी काय समजणार ? आणि इंग्रजी तरी काय कळणार ? फ्रेंचमध्यें बोललें पाहिजे त्याच्याशीं ! हो ! नाहीं तरी आम्हांला आमची फ्रेंचची ऐट मिरवायची हौस असतेचना ! मी घटकानुघटका त्याच्याशीं फ्रेंचमध्यें बोलत बसें. "नेपोलिआँ मॉनामूर ! मॉं ग्रां शेरी ! मॉं पती शू अं तू पति बिजू" किती नि काय ? त्यानें बिचाऱ्यानें कधीं हिंदुस्थानाचा किनारा तरी ओलांडला होता कीं नाहीं परमेश्वर जाणे; पण मी मात्र त्याला माझ्या फ्रेंचच्या तोंडीं देऊन घेतलें. नेपोलिअनवर प्रेम करण्यांत दिवस कुठें गेला समजलेंच नाहीं. संध्याकाळीं तरी आमचे मध्यस्थ येतील असें वाटलें होतें; पण सूर्य अस्तास गेला, तरी ते येण्याचें कांहीं चिन्ह दिसेना.

आतां काय करावें ? नेपोलिअननें तर आज पायसुद्धां हलवले नव्हते. सारा दिवस तो बसूनच होता. अशानें अधिकच भडकायचा अशी भीति वाटून, मीं त्याला हातीं धरून बाहेर फिरवून आणायला गेलें. तोहि आनंदानें माझ्याबरोबर आला. गाडीवाल्यालाहि मागून यायला सांगितलें होतें. मीं

नेपोलिअनला चांगला दोन-अडीच मैल हिंडवून आणला. त्याच्याशीं फ्रेंचमध्यें माझी वटवट सारखी चालूच होती. मधून मधून मी गाडीवाला मागून येतो कीं नाहीं तें वळून पाही आणि प्रत्येक वेळीं तो खालीं मान घालून आपल्याशींच हंसतांना दिसे. रस्त्यांतले लोक आळीपाळीनें आम्हां तिघांकडे बघत. मला त्याचें कांहींच वाटत नसे. नेपोलिअनला तर त्याहून कांहीं वाटत नव्हतें. पण माझ्या गाडीवाल्याला मात्र चमत्कारिक वाटत होतें खास. ही बाई आपणच घोड्याला धरून फिरवते काय, त्याच्याशीं गेंगाण्यासारखें बडबडते काय, आणि बाई तरी काय बाप्यावाणी इजार घातलेली. सगळाच चमत्कार! अंधार पडायच्या सुमारास आम्ही तिघें घरीं आलों. त्याची चाकरी करून घेतली, त्याला ओट्स् खाऊं घातले, गवताची सुंदर शेज केली व मी घरांत आलें. सकाळीं उजाडतांच मीं आमच्या दलालाकडे बोलावणें धाडलें. पण ते आज येऊं शकणार नाहींत असा निरोप आला. म्हणजे ही काय वागण्याची पद्धति? आजचा तिसरा दिवस. उद्यां घोडें परत करायचें आहे. तोंपर्यंत तें नीट पाहून नको का घ्यायला? आतां काय करावें! सर्व संकटांत हात देणारे आपले डॉक्टरहि गांवाला गेले आहेत. पण खरेंच; आज यायचे होते ते परत. लगेच मी दवाखान्यांत गेलें व नेपोलिअनचें सर्व चरित्र त्यांच्याजवळ एकदां वाचलें. दवाखाना बंद होतांच मी येतों, तुम्ही ओळखीचे एकदोन गाडीवाले अथवा टांगेवाले बोलावून ठेवा; आपणच त्याला जोडून पाहूं, असें आश्वासन या गुरुजींनीं मला दिलें. मीहि तेथून घरीं आलें व रावजीला बोलावणें धाडलें. जिमखान्यावरचे बाबू, हरी, रामा सगळे गोळा केले. ते आलेहि मोठ्या खुशीनें. कां नाहीं येणार! फुकटची गंमत पाहायला मिळते. शिवाय जितका वेळ जाईल तितकी वर्दी समजून बाई पैसेहि देणारच. मग कां नाहीं येणार? माझा गाडीवालाहि होताच.

एक दीड वाजतां डॉक्टर आले. नेपोलिअन पाहतांक्षणींच त्याच्या मनांत

भरला. त्याची किंमत विचारतांच मीं किंमत सांगितली त्यावर " किंमत इतकी कमी का ? घोडें तर मस्त दिसतें आहे. कांहीं खोडबीड नाहींना ? कारण जनावराच्या मानानें किंमत फारच कमी वाटते " असें आपलें निदान डॉक्टरांनीं तत्काळ बोलून दाखविलें. " किंमत आहे खरी कमी. पण घोडें चांगल्या ठिकाणीं पडावें म्हणून ठेवली असेल कमी. भाडोत्रीला द्यायचें नाहीं अशी अट आहे ना त्या साहेबाची. त्यापेक्षां गोळी घालून ठार करीन, असं म्हणाला कीं तो. अहो, महाचक्रम् असतात हे साहेब " असें म्हणून रावजीला मीं जीन चढवायला सांगितलें व माझ्या गाडीवाल्याला परवाचे दोरखंड आणायचा हुकूम केला. त्यावर रावजी म्हणतो, " बाई, कशाला हवे ते दोरखंड ? माझ्या गाडीचे पट्टे पुरे झाले त्याला. " " वा, तुझ्या गाडीचे पट्टे जुने आहेत. तोडून पळाला म्हणजे मग ? दांडगं आहे हें घोडं. परवा पाहिलास ना त्याचा थयथयाट ! " " दांडगं कसलं, बाई ? बसवून ठेवलें आहे त्याला पंधरा दिवस म्हणून झाडलेन् जरासे पाय. चालू घोडं आहे हें " रावजीनें उत्तर दिलें. " म्हणजे तूं याला गाडीला जोडलेलें पाहिलें आहेस ? ते दलाल तर म्हणत होते याला शिकवायला पाहिजे. " " कांहीं शिकवायला नको. त्या खाणींतल्या मुसलमानाच्या गाडीला कैक वेळां जोडलेलें पाहिलें आहे मीं. " " मग बोलला कां नाहींस परवां ? " " तुम्ही आमाला कवा इचारलं बाई ? ते रावसाहेब करीत होते समदा कारबार म्हून मी मुकाट बसलों. " " वा ! बराच दिसतो कीं, " म्हणून मीं दोरखंडच बांधले. उगीच कशाला नसत्या पंचाइती करा. दोरखंड बांधला म्हणून बिघडत तर नाहीं ना कुठें ? नाकावर मात्र काथ्या बांधायच्या वेळीं डॉक्टरहि म्हणाले, " काथ्याची कांहीं जरूर नाहीं. उगीच चिडेल जनावर. " शिवाय परवाच्या काथ्यानें बिचाऱ्याच्या नाकाच्या मखमलीचा एक टवका निघाला होता. अयाई ! गरीब बिचारा.

पूर्वानुभव लक्षांत ठेवून गाडी आधी बाहेर काढूनच घोडा जोडला होता. रावजी घोडा हाकणार होता. शेजारीं मी बसलें, तेव्हां डॉक्टरना गाडींतच बसणें प्राप्त झालें. माझा गाडीवाला, बाबू, हरी, रामा सगळे बरोबर पळत होते. इशारा करतांच घोडें चालू झालें. प्रथम थोडेंसें चौखूर उधळलें; पण चतुःशृंगीच्या रस्त्याला लागतांच बराच चढ आहे, तेथें तें साध्या चालीनें जाऊं लागलें आणि पाव-एक मैल गेल्यावर तें पुढला डावा पाय काढूं लागलें. बरोबर ! त्याच्या पुढल्या पायावर पहिल्याच दिवशीं मीं फडकीं बांधलेलीं पाहिलीं होतीं खरीं. पण परवा त्या दलालांनीं घोडें हाकललें तेव्हां कसें नाहीं ध्यानांत आलें ? तेव्हां तें मुळीं साध्या चालीनें चाललेंच कुठें ? चिडून सारखें चौखूरच दौडत होतें. आणि दौडीच्या चालींत सर्व पायांना काम पडत नाहीं. तेव्हां हा अधू पाय त्या वेळीं कळला नसेल. तेवढ्याकरितांच तर त्याच्या नाकावर करकचून काथ्या बांधला नव्हता ना ? "काय रे रावजी, परवां घोड्याला मुद्दाम चिडविण्यासाठींच का रे त्याच्या नाकावर काथ्या बांधला होता ?" रावजी थोडासा हंसून म्हणाला "बाई, तुम्ही बरं वलकलं." "मेल्या, म्हणजे तुला हें माहीत असून तूं मला सांगितलं नाहींस ?" "बाई धंदा आहे हा." "कसला आला आहे धंदा ? हें काय तुझं घोडं होतं म्हणून तूं त्याचे दोष पोटांत घालून स्वस्थ बसावंस ?" "घोडं माझं नाहीं बाई. पण त्या दलालाच्या समोर आम्हीं कसं बोलावं ? माझंही एक घोडं परवा त्याच्यामार्फत वोपलं कीं." "अस्सं होय ? म्हणजे तूं त्यांना सामील आणि मी तुझ्यावर भिस्त ठेवून होतें. बरं तर बरं लवकर कळलं. वळवा आतां गाडी आणि चला घरीं. पुरे झाली परीक्षा." तरीच किंमत इतकी कमी ठेवली बरें का. एकूण आमच्या नेपोलिअनचें चांगलेंच वॉटर्लू झालें म्हणायचें ! आतां संध्याकाळींच त्याला परत करावा असा बेत मीं डॉक्टरांना बोलून दाखवला, परंतु त्यांचें मत पडलें कीं एकदां

कोणातरी अश्ववैद्याला दाखवून काय तक्रार आहे तेवढें तरी निश्चित करावें. पण अश्ववैद्य तरी आपलें प्रामाणिक मत देतील का, असा विचार मी बोलून दाखवणार तोंच डॉक्टरांनीं मला एक पत्ता दिला.

तेथें मी नेपोलिअनला घेऊन जातें तों एक भलें मोठें कुत्रें माझ्या अंगावर धावून आलें. सुदैवानें तें बांधलेलें होतें; नाहींतर नेपोलिअन्‌ला पाहण्याच्या आधीं आमचीच शुश्रूषा करण्याची पाळी यायची. अश्ववैद्यांनीं नेपोलिअन्‌ला नीट तपासून पाहिला व हा तो अमक्यातमक्या साहेबाचा घोडा आतां बोलाईच्या खाणीजवळ असतो तोच ना, असा प्रश्न केला. " वा ! जनावर आपल्या माहितीचें दिसतें, " असे उद्‌गार मीं काढतांच तें आपल्याकडे कांहीं दिवसांपूर्वीं औषधाला येत असल्याचें त्यांनीं सांगितलें. पायाला काय झालें आहे असें विचारतांच कळलें कीं घोडें प्रथम शर्यतीचें होतें. तेथें तें लंगडें झालें. " म्हणजे आतां पाय बरा होणें शक्य नाहीं तर ? " मीं म्हटलें. " होईल बरा, पण दीड-दोन महिने सकाळसंध्याकाळ औषधानें पाय चोळला पाहिजे. तुमच्या घरीं तें काम देईल, कारण घरगुती काम असून किती असणार. " आतां प्रश्न पडला कीं, पाय अधु आहे हें माहीत असूनहि हें घोडें घ्यावें कीं नाहीं ? कदाचित् किंमत आणखी कमी करतां येईल; पण कितीहि हुंडा मिळाला म्हणून उघडया डोळयानें का कुणी रोगट मुलगी पसंत करील ? नकोच ती भानगड असें ठरवून आमच्या चार दिवसांच्या ह्या दुसऱ्या सोबत्याची बोळवण केली. गंमत ही कीं या साऱ्या अवधींत आमचे वृद्ध दलाल जे गुप्त झाले होते ते गुप्तच राहिले.

नेपोलिअनची पाठवणी केल्यानंतर मला चार दिवस मुळींच करमलें नाहीं. सारखी त्याची आठवण येई. आठ एक दिवस झाल्यावर हळूहळू त्याचा विसर पडूं लागला व मी दुसऱ्या घोड्याचा विचार करूं लागलें. परंतु या सबंध आठवड्यांत एकहि घोडें माझ्याकडे दाखवायला आलें

नव्हतें. माझ्या गाडीवाल्याला यासंबंधी विचारतां तो म्हणतो, "बाई, मायंदाळ घोडीं हायत; पर लोक म्हणतात ती बाई लई चवकशा करती जनावराच्या." करते म्हणजे करणारच. पैसे देऊन माल विकत घ्यायचा तो नीट पाहून नको का घ्यायला?

दोन दिवसांनीं डॉक्टरांकडून निरोप आला कीं, एका कर्नलची बदली झाल्यामुळें त्याचें घोडें विकायचें आहे. दुसऱ्या दिवशीं डॉक्टर व मी बाबूच्या टांग्यांतून त्या कर्नलकडे गेलों. घोडें मोठें व पंचकल्याणी होतें, छाती वगैरे छान रुंद होती. कर्नलच्या घरीं तें घोडें डॉग्कार्टला चालत असे. किंमतहि योग्य होती. अर्थात् मला तें घोडें चालवून पाहायला पाहिजे होतें; पण मालक आणि मालकीण दोघेहि घरीं नव्हतीं, तेव्हां त्यांचा फोन नंबर टिपून घेतला व तेथून परतलों. वाटेंतच टाइम्समध्यें घोडें पाहिजे असल्याची जाहिरात दिली व स्टेशनावर चहा घेऊन घरीं आलों.

दुसऱ्या दिवशीं एका ठिकाणीं दोन घोडीं असल्याचें कळल्यावरून मी तेथें गेलें. दोनहि घोडीं चालवून पाहिलीं. त्यांतलें एक मला आवडलें व ताबडतोब माझ्या अश्ववैद्यांनाहि मीं तें दाखविलें. त्यांनींहि तें पसंत केलें. सर्व कांहीं लवकर जमलें, पण तें होतें तांबडें. मला पाहिजे होतें पांढरें अथवा काळें कुळकुळीत. पण जाऊं द्या, आतां काय रंगासाठीं अडून बसायचें आहे? मुली पाहायला निघायच्या आधीं माणसाच्या पुष्कळच अटी-तटी असतात. गोरी पाहिजे, उंच हवी, केस कुरळे पाहिजेत, जिवणी लहान हवी, इ. इ. पण जसजशा डोळ्यापुढल्या गोऱ्यागोमट्या मुली हळूहळू उडून जातात, तसतसा माणूस अगदीं मऊ येतो आणि काळी असूं दे, ठेंगणी असूं दे, केस खराट्यासारखे असूं देत, जिवणी या कानापासून त्या कानापर्यंत असूं दे; पण एकदा बायको मिळूं दे; असें त्याला होऊन जातें, तसेंच माझें झालें होतें. घोडें हिरवें का असेना, मला चालेल. बाकी सर्व ठीक असलें

म्हणजे झालें, असें ठरवून तें घोडें मी घेतलें असें सांगून, घरीं येऊन चेक लिहिला व घोडें आणायला मीं गाडीवाल्याला पाठविला. पण तो जें घोडें घेऊन आला तें होतें ठिपक्याचें. "हें कोठलें घोडें आणिलेंस" असें विचारतां त्यानें सांगितलें कीं, "बाई, मालकांचा विचार बदलला; तें तांबडें घोडें ते आपल्यालाच ठेवून घेणार आहेत, पाहिजे असेल तर हें दुसरें पाठविलें आहे." वा:, एक मुलगी दाखवून बोहोल्यावर दुसरी उभी करतात. असें मीं ऐकलें होतें, त्याचीच ही एक आवृत्ति म्हणायची! "जा, परत घेऊन जा तें घोडें आणि माझा चेक आण माघारी. बरें झालें, मीं तो क्रॉस केला आहे." असें सांगून मी स्वस्थ बसतें तोंच कालच्या त्या कर्नलच्या घोडयाची आठवण झाली, व मी त्याला टेलिफोन करण्यासाठीं बाहेर पडलें. टेलिफोनवर, घोडें जोडून केव्हां पाहायला मिळेल असें विचारलें. तर तें घोडें सकाळींच विकल्याचें समजलें.

घोडें मिळणें ही इतकी कठीण गोष्ट असते का? याच्या निम्यानें खटपट केली असती, तर पंचवीस मुलामुलींचीं लग्नें जमवून दिलीं असतीं. पण चार महिने व्हायला आले, तरी माझ्या गाडीचें अजून कोठें जमेना. कोठल्या मुहूर्तावर नीट करायला टाकली कोण जाणे? चार–पांच दिवस असेच गेले. एखाद दुसरें जनावर दाखवायला आलें होतें! पण कोणी तोंडाला जड तर कोणी पायांत लंगडें. टाइम्समध्यें माझी जाहिरात दोनदां येऊन गेली. एक दिवस मला कोरेगांव पार्कमधून एक पत्र आलें. एक डॉग्कार्ट व घोडें विकायचें होतें. दुपारीं मी टांगा करून डॉक्टरांना घेऊन तिकडे गेलें. बंगल्यांत गेलों व नांवाची चिठ्ठी आंत पाठवून दिवाणखान्यांत वाट पाहात बसलों. आंतून कोणाचें तरी कण्हणें ऐकूं येत होतें; मधूनच कोणी तरी घाबऱ्या घाबऱ्या बोलल्याचा भास होई. डॉक्टर व मी एकमेकांकडे पाहत बसलों. बऱ्याच वेळानें हातमोजे व पांढरे एप्रन घातलेल्या डॉक्टरबरोबर एक

बाई जवळ जवळ रडत रडतच बाहेर आली. दोघांनीं हस्तांदोलन केलें व " आतां धीरानें वागा, फार शोक करूं नका " असा उपदेश करीत डॉक्टर निघून गेले. इतका वेळ त्या बाईचें आमच्याकडे लक्षहि गेलें नव्हतें, व बिचारी आपले अश्रु पुशीत होती. आम्हांलाहि चोरट्यासारखें झालें. इतक्यांत ती वळली व आम्ही तिच्या दृष्टीस पडलों. तिनें स्वतःला जरा सांवरलें व हंसण्याचा प्रयत्न करून ती म्हणाली, " माफ करा हं, आपल्याला फार वेळ बसायला लागलं. " ती फार दुःखांत आहे हें ओळखून मीं म्हणालें, " आपलें मन जर आज स्वस्थ नसेल, तर आम्ही फिरून येऊं. " " मन नाहीं खरेंच स्वस्थ; पण तें आतां कधींच स्वस्थ होणार नाहीं, " हुंदका दाबीत ती म्हणाली. " माझी लाडकी पेगी आतांच मला सोडून गेली. " " आपली मुलगी होती पेगी ? " तिची दया येऊन मीं विचारलें. " नाहीं हो, माझी कुत्री होती ती. पोटच्या पोरापेक्षां माझें प्रेम होतें तिच्यावर. सकाळपासून अडली होती बिचारी. डॉक्टरांच्या चार खेपा झाल्या, पण नाहींच तिला सोडवतां आली. " " अरेरे, आणि पोरें तरी लागली का हातीं ? " मीं विचारलें. " हो, पहिलें आहे जिवंत. दुसऱ्याच्या वेळींच गेली. तें पोरहि गेलें. बरें, मी जातें आंत त्याची व्यवस्था पाहायला......पण खरेंच तुम्ही घोडें पाहायला आला नाहीं ? " आम्हीं मान डोलावतांच तिनें मोतद्दाराला हाक मारून आम्हांला घोडें दाखवायला सांगितलें. तिचा निरोप घ्यायच्या आधींच मीं विचारलें " किती दिवस आहे हें घोडं आपल्याकडे ! " " किती कोठले ? विकत घेतल्याला आज पंधरा दिवससुद्धां झाले नसतील " तिनें बेसावधपणें उत्तर दिलें. " मग इतक्या लवकर विकून कां टाकता ? " आतां मात्र ती जरा शुद्धीवर आली व अं अं करूं लागली. " मला डॉगकार्टमध्यें चढतां येत नाहीं, माझा गुडघा दुखावलेला आहे म्हणून विकतों आहों " असें तिनें कांहीं तरी उत्तर

दिलें. " हें घोडें पूर्वी कोणाचें होतें ? " असें त्यावर डॉक्टरांनीं विचारतां, बदली झालेल्या एका कर्नलचें होतें असें म्हणून तिनें एका कर्नलचें नांव सांगितलें; व मीं ज्या कर्नलचें घोडें पाहिलें होतें तोच हा कर्नल निघाला व घोडेंहि अर्थात् त्याचेंच.

त्या वेळीं हांकून पाहायला मिळालें नाहीं, आतां मिळेल. किंमत पहिल्या-पेक्षां आतां पन्नासांनीं कमी झाली होती. बाहेर येऊन आम्हीं तें घोडें पाहिलें व डॉगकार्टमध्यें बसून हांकलेंसुद्धां. घोडें बरें होतें, पण त्या बाईनें इतक्या लवकर फिरून विकायला कां काढलें या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळेना. शिवाय किंमतहि उतरली होती, तेव्हां घोड्यांतच कांहीं तरी खोड असली पाहिजे, असा संशय सारखा मनांत येऊं लागला व उद्यां कळवितें असें सांगून आम्ही घरीं आलों. दुसऱ्या दिवशीं आम्हीं अर्थात् घोडें नको असेंच कळवलें. हो, आणखी पांच घरें बदलल्यावर तें घोडें कदाचित् फुक-टच मिळणार नाहीं कशावरून ?

गाडी घरीं आल्याला चार महिने व्हायला आले होते. अजून घोडें मिळायचा कांहीं रंग दिसेना. गाडीवाला चैनींत नोकरी करीतच होता. एक दिवस सकाळीं एका मुसलमानाकडे एक सुंदर नवीन घोडें आल्याचें त्यानें मला सांगितलें. मी लगेच त्याच्या तबेल्यांत जाऊन थडकलें. तबेल्याच्या वाटेंतच एक गाय बांधली होती. दुरून मालकानें घोडें दाखविलें, पण तेथें होता अंधार. मीं गाईला धरून ठेवायला सांगितलें, व घोड्याजवळ गेलें आणि उजेड यावा म्हणून घोड्याच्या तोंडाकडली खिडकी उघडली. माझा शब्द ऐकतांच घोडें फुरफुरलें. अरे, हें ओळखीचें घोडें असावें ! मला तर तें नेपोलिअनसारखें वाटलें व त्याप्रमाणें मीं माझ्या गाडीवाल्याजवळ माझा संशय व्यक्त केला. " छे छे, बाई, तें घोडं नवं हें. त्याचे मागले दोनहि पाय खुराशीं पांढरे होते. याचा एकच

पांढरा आहे. " मीं तरी नेपोलिअनचे मागले पाय कुठें एवढें न्याहाळून पाहिले होते ? घोड्याची किंमत विचारली, तर नेपोलिअनच्या किंमतीच्या बरोबर दुप्पट असल्याचें कळलें. विचार करीत मी त्या मुसलमानाच्याबरोबर बाहेर आलें. " किती दिवस आहे हें घोडें तुमच्याकडे ! " " एक महिना होईल आतां. " " आधीं कोणाकडें होतें ? " " एका साहेबाकडे. फार उत्तम घोडें आहे, बाई. जिमखान्यावरच्या एका ब्राह्मणाच्या बाईनीं चार दिवस ठेवूनसुद्धां घेतलें होतें. पण तें गाडीला शिकवलेलें नव्हतें, म्हणून तिनें परत केलें. आतां मीं शिकवून चांगलें तयार केलें आहे. तुम्ही जोडून पाहा हवें तर. " ही हकीकत ऐकून माझ्या डोळ्यांत लख्ख प्रकाश पडला व थोडीशी गम्मतहि वाटली.

मुसलमानाकडून कां होईना, मला ' ब्राह्मणाची बाई ' असें शिफारसपत्र मिळालेलें ऐकून जरा धन्य वाटलें, व मी म्हणालें, " आतां गाडीला शिकवून तयार केलें असें म्हणतां म्हणून किंमत पहिल्याच्या एकदम दुप्पट केलीत कीं काय ? " " पहिल्याच्या दुप्पट ? म्हणजे हें घोडें तुमच्या माहितीचें आहे ? " " आहेना, चांगल्या माहितीचें आहे. जिमखान्यावरची ब्राह्मणाची बाई ती मीच. आजच्या माझ्या पोषाकावरून कदाचित् तुमच्यांतलीच वाटत असेन. हें घोडें तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें चार दिवस माझ्याकडे होतें व तें मीं स्वतः गाडीला जोडून पाहिलें आहे. तें पुढल्या डाव्या पायांत लंगडें आहे म्हणून परत केलें. शिकवायला पाहिजे म्हणून नव्हे. शिकवायचा बहाणा करून पैसे उकळण्याची कल्पना आमच्या दलालांच्या डोक्यांत असेल कदाचित्. शिवाय त्या वेळीं मला तुम्ही सांगतां त्याच्या निम्या किंमतीला तें मिळालें असतें. " असें म्हणून मी तेथून निघालें, व टांग्यांत येऊन बसलें. माझा गाडीवाला पुढें होता. " काय रे, तूं किती वर्षें गाडीवाल्याचा धंदा करतो आहेस ? " " बाई, याच धंद्यांत

केस पांढरे झाले नव्ह का ? " " केस पांढरे झाले आणि मन काळें कुळकुळीत झालें असेंचना ? " " म्हणजे काय, बाई. " "नाहीं तर काय ? एरवी का तूं हें जुनें लंगडें घोडें दुप्पट किमतीला माझ्या गळ्यांत मारूं पाहत होतास ? माझ्यासारख्या बाईला घोडं ओळखावं आणि तूं घोडेवाला म्हणवतोस स्वतःला, तुला घोडं ओळखूं नये ? शिवाय चार दिवस चाकरी केलेलं घोडं, नुसतं पाहिलेलं नाहीं. तेव्हां तूं पक्का हलकट तरी असला पाहिजेस; नाहीं तर महामूर्ख असला पाहिजेस. त्या घोडयानंसुद्धा मला ओळखलं आणि तूं नवं घोडं, नवं घोडं करीत होतास. " घरीं आल्याबरोबर मीं त्याचा पगार चुकता केला व फिरून माझ्या अंगणांत पाय ठेवण्याची मनाई केली.

झालें. घोडें नव्हतेंच मिळत, आतां तर गाडीवालाहि गेला. बरेंच झालें म्हणा. तेवढा पगार वांचला माझा. कारण आमचा सत्याग्रह अजून चालूच होता. वजन पंधरा पौंड कमी झालें होतें व सगळे लोक तुम्हांला काय होतं आहे, तुम्ही कशानें वाळलां, असें विचारीत. मलाहि जगण्यांत अगदीं आनंद वाटेनासा झाला होता खायचें नाहीं तर जगायचें कशाला ? घोडा गाडी ठेवून दाखवयाच्या हट्टानें आणखी आठ महिने सत्याग्रह चालवून दाखवयाचा होता पण जळ्लें घोडेंहि मिळेना. कधीं मिळणार आहे कोणास ठाऊक. उगीचच मी आपलें डोकें मात्र आपटून घेत होतें.

आतां घोडें मिळेपर्यंत हा गाढवपणा बंद करायचा असें ठरवून त्या दिवशीं मीं शिकरणपोळीवर असा ताव मारला कीं घरांत दूध शिल्लक राहिलें नाहीं कीं केळीं शिल्लक ठेवलीं नाहींत. चहा तर काय पुढचा पेला कधीं हलेचना. जसजशी पोटाची आग थंड होत चालली, तसतसें घोडें पाहायचें कामहि थंडावलें. इकडे दुष्काळाचीं चिन्हें दिसूं लागलीं व आज गहूं नाहीं, उद्या तांदूळ नाहीं, अशी ओरड ऐकूं येऊं लागली. माणसाला धान्य मिळायची

जेथें पंचाईत तेथें घोडयाची उठाठेव हवी कशाला ? शिवाय दुसरा गाडीवालाहि पाहिला पाहिजे, कारण आलेंच घोडें घरांत तर तें काय मोटारीसारखें बसवून ठेवतां येतें ? त्याला काम दिलें पाहिजे, खाऊं घातलें पाहिजे, धुतलें पाहिजे, मालिस केलें पाहिजे, एक ना दोन. आणि हें सगळें मलाच पाहिलें पाहिजे; कारण आमचे गणपतीबोवा घरांतलें कधींच कांहीं पाहत नाहींत, आणि गाडीघोड्यासंबंधीं तर त्यांनीं केव्हांच हात धुवून टाकले आहेत. तेव्हां घरांतला पुरुषहि मीच आणि बाई पण मीच. मग मी कधीं कधीं पुरुषासारखी विजार घालून हिंडलें तर लोकांनीं नाकें कां मुरडावीं ! आतां नकोच ती घोड्याची कटकट. गाडीच टाकावी विकून झालं, म्हणजे फिरून सत्याग्रहाची भानगडहि उपस्थित होणार नाहीं.

झालें, गाडी विकायच्या उद्योगाला मी लागलें. ज्यांना ज्यांना घोडें पाहा असें सांगितलें होतें, त्यांना त्यांना गाडीला गिऱ्हाईक पाहा असें सांगितलें. हळूहळू गाडी बघायला लोक येऊं लागले. गाडी नवीच आहेना ? असा पहिला प्रश्न करीत. खरोखर नवीच आहे असें उत्तर द्यायला कांहींच हरकत नव्हती. दुसरें कोणी असतें तर नवीच आहे असेंच म्हणालें असतें. पण खोटें बोलायला तरी यावें लागतें. तेव्हां " नवी नाहीं, लोखंडी सांगाडा जुनाच आहे, बाकी सगळें नवीन आहे, " असें सरळ उत्तर मी देत असें. त्यानंतर किंमत काय असें विचारीत. मी एक किंमत मनाशीं ठरवली होती ती सांगत असें. ती ऐकून खरी किंमत काय, असा दुसरा प्रश्न येई. मग मात्र माझा पारा चढे. " माझ्याजवळ सगळें खरेंच असतें, सांगितलेली किंमत पटत असेल तर गाडी घ्या, नाहीं तर पडून राहील, " असें बडबडून गिऱ्हाईक जायच्या आधींच मी वर आपल्या खोलींत निघून जाई.

अशा अरेरावीनें का कोठें व्यवहार होतात ? सहा महिने झाले, तरी गाडी कांहीं खपेना. खरें पाहिलें तर किंमत जास्त नव्हती आणि गेल्या सहा

महिन्यांत तर सगळ्याच्याच किंमती अवाच्या सवा वाढल्या होत्या. पण आम्हांला गोड कोठें येत होतें बोलतां? तें येत असतें, तर दुप्पट किंमतीलाहि गाडी उजवली असती. पण आमचा अवतार पडला पिंजारलेल्या साळईचा. असें करतां करतां एक दिवस मी टेनिस खेळत असतां कोर्टावरतीच माझा मामा आला आणि म्हणाला "शके, तुझी गाडी विकली. काढ पेढे." "केव्हां विकलीस, आणि, कुणाला विकलीस?" असें विचारतां तो म्हणतो, "अग त्या बंडू दातारानें घेतली असें समज. काल मला जिमखान्यावर किंमतीचें विचारीत होता. म्हणाला, ती बाई कांहीं नीटपणें बोलत नाहीं. तुमचें नातें आहे, तुम्ही तरी सांगा."

"बरं, मग मामासाहेब तुम्हीं काय सांगितलेंत?" "काय सांगायचें आहे, गाढवे? मीं म्हटलें, "अरे त्या बयानें तुला हजार रुपये सांगितलें असतील, तर ती नऊशें नव्याण्णव रुपये पंधरा आणे नऊ पैलासुद्धां कबूल व्हायची नाहीं. असली चक्कर आहे ती." तेव्हां चल काढ आतां पेढे. आणि खरोखरीच त्याच दिवशीं आमची गांवभर गाजलेली गाडी गेली दुसऱ्याकडे. आतां कधीं कधीं ती गांवांतून हिंडतांना दिसते. घोडेंहि पांढरेंच आहे. तिच्याकडे पाहून मला काय वाटत असेल बरें! आणि अजून मला लोक विचारीत असतात. "तुमच्या घोडागाडीचें काय झालें?" दुसरें काय व्हायचें आहे? एक चऱ्हाट झालें लिहून.

